# मानवतेचा राजमार्ग


लेखक

१) अबू मुहम्मद इमामुद्दीन रामनगरी

२) मुहम्मद जैनुल आबिदीन मन्सुरी

भाषांतर

सय्यद ज़ाकिर अली

## अनुक्रमणिका


| प्र. क्र. | नाव | पृष्ठ क्र. |
|---|---|---|
| | भूमिका | ५ |
| १ | **मानवतेचा राजमार्ग** | ७ |
| | १) धार्मिक विश्वास | ८ |
| | २) भौतिकवाद | १० |
| | वास्तविकत रोग आणि त्याचे निवारण | १२ |
| २ | **वेदांमध्ये हिंदू धर्माची मानवतावादी शिकवण** | १४ |
| | लेखक महोदयांची भूमिका | २६ |
| | मानव-धर्माची दहा कर्तव्ये | २८ |
| | १) धृति : | २८ |
| | २) क्षमा : | २८ |
| | ३) दम : | २८ |
| | ४) अस्तेय : | २८ |
| | ५) शौच : | २९ |
| | ६) इंद्रिय निग्रह : | २९ |
| | ७) धी : | २९ |
| | ८) विद्या : | ३० |
| | ९) सत्य : | ३० |
| | १०) अक्रोध : | ३० |
| ३ | **इस्लामची मानवतावादी शिकवण** | ३२ |
| | कुरआनाची शिकवणी | ३३ |
| | १) न्यायाची शिकवण | ३३ |
| | २) प्रतिज्ञापालनाची शिकवण | ३३ |
| | ३) धैर्य आणि संयमाची शिकवण | ३४ |
| | ४) क्षमादानाची शिकवण | ३४ |
| | ५) प्रमाणबद्ध व योग्य मोजमापाची शिकवण | ३४ |
| | ६) उपहास करण्याची मनाई | ३६ |
| | ७) परनिंदा करण्याची मनाई | ३६ |
| | ८) कुरआनाची एक सर्वांगीण शिकवण | ३६ |
| | ९) सर्वांशीच चांगला व्यवहार करण्याची शिकवण | ३७ |
| | १०) मुस्लिमांची वैशिष्ट्ये | ३७ |

| प्र. क्र. | नाव | पृष्ठ क्र. |
|---|---|---|
| | प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या शिकवणी | ३९ |
| | प्रेषित मुहम्मद (स.) यांनी दिलेली सुशीलतेची शिकवण | ३९ |
| | दयाभावाची शिकवण | ४० |
| | नम्रतेची शिकवण | ४१ |
| | क्षमा करण्याची शिकवण | ४१ |
| | सहिष्णुतेची शिकवण | ४१ |
| | सत्य आणि प्रतिज्ञापालनाची शिकवण | ४२ |
| | सामान्यजनांशी उत्तम व्यवहाराची शिकवण | ४२ |
| | शेजारधर्म पाळण्याची शिकवण | ४४ |
| | दुराचार व दुष्कर्मांची मनाई | ४४ |
| | व्यापारात प्रामाणिकतेची शिकवण | ४५ |
| | अवैध व अनुचित पद्धतीने संपत्ती मिळविणे | ४६ |
| | भ्रष्टाचार आणि लाचलुचपत | ४६ |
| **४** | **मानवीय मूल्यांच्या उत्थानात इस्लामी मूळ धारणांचे योगदान** | ४८ |
| | एकेश्वरवादाची धारणा | ४८ |
| | ईश्वरोपासना | ४८ |
| | १) नमाज | ४९ |
| | २) रोजा (इस्लामी पद्धतीचा उपवास) | ५१ |
| | ३) जकात | ५५ |
| | ४) हज | ५७ |
| | ५) परलोकाची धारणा | ५८ |
| | ६) प्रेषितत्वाची धारणा | ६१ |
| | इस्लामी धारणांच्या योगदानांचे व्यावहारिक पुरावे. | ६५ |
| | १) इस्लामच्या शुभागनापूर्वी मानवतेची दशा | ६५ |
| | आरंभिक तेवीस वर्षांतील सुधार व परिवर्तन | ६६ |
| | अंतिम प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या नंतर | ६९ |
| | इस्लामी शासन काळानंतर आजपर्यंत | ७१ |
| | एक विचारपूर्ण दृष्टी | ७२ |
| | एक ईश्वर! एक मानव!! एक विधान!!! | ७४ |
| | अंतिम निवेदन | ७९ |

“अल्लाह, असीम कृपावंत व दयावंतच्या नावाने”

# भूमिका

आज सर्वत्र विज्ञान आणि संशोधनाचे पडघम वाजत आहेत. सर्वत्र भौतिकवाद आणि चंगळवादाचे वातावरण आहे. अशा वातावरणात आजचे विज्ञानवादी आणि नास्तिकांनी ईश्वराचे स्थान बळकावले. ईश्वराच्या सामर्थ्य आणि अस्तित्वावरच आपला जम बसविला. ज्ञान व विज्ञानाच्या आणि संशोधनाच्या तंद्रीत ईश्वरी अस्तित्वच नाकारित आहे. ज्ञान आणि प्रगतीच्या उंच शिखरावर चढताना मानवता आणि नीतीमत्ता पायदळी तुडवित आहे. अर्थातच स्वत:स संशोधक आणि विज्ञानवादी समजणाऱ्या महाभागांना विज्ञान आणि प्रगतीचे शिखर चढताना आपण मानवतेस पायदळी तुडवित असल्याची मुळीच चिंता नाही. डार्विनने तर मानवास माकडाचा वंशज असल्याचाच शोध लावला. (त्याचे हे संशोधन नंतरच्या एका संशोधकाने चुकीचे असल्याचा शोध लावला, ही बाब वेगळी.) मात्र आज मानवाची अवस्था पिसाळलेल्या पशुपेक्षाही जास्त वाईट झालेली आहे. वाटेल त्यास फाडायचे आणि वाटेल त्याचा मुडदा पाडायचा, अगदी क्षुल्लक कारणावरून साधण्यासाठी इतरांचे रक्त सांडणे, इतरांच्या भावना तुडवायच्या, मानवतेची नग्न धिंड काढायची, हिंसाचार माजवायचा, अशी प्रवृत्ती मानवामध्ये निर्माण झालेली आहे. मानवाच्या या पशूपेक्षाही जास्त क्रूर प्रवृत्तीवर कसा आळा घालायचा, हा एक यक्षप्रश्न आपल्यासमोरं आ वासून उभा आहे. याशिवाय आणखीन एक विचित्र परिस्थिती अशी आहे की, ज्यांना हा प्रश्न सोडविण्याची चिंता आहे, त्यांच्यात सामर्थ्य नाही. म्हणून केवळ चिंता करून आणि मानवतेची केवीलवाणी अवस्था पाहून तडफडण्यापलीकडे त्यांच्याकडे काहीही पर्याय नाही.

देशाच्या कल्याणासाठी एकच भाषा, एकच सभ्यता व संस्कृती आणि परंपरा, तसेच सर्वांसाठी एकच समान नागरी कायदा असावा. असे ज्यांना वाटते ते पूर्णत: स्वत:ही भ्रमात पडलेले असून इतरांचीसुद्धा दिशाभूल करीत आहेत. त्यांना एक अत्यंत साधी गोष्ट लक्षात येत नाही की ज्या देशांमध्ये सर्वांसाठी एकच भाषा एकच सभ्यता व संस्कृती आणि समान नागरी कायदा लागू आहे, त्या देशांची काय अवस्था आहे? या गोष्टी लागू झालेल्या असूनही त्या देशांत उपद्रव आणि आपसातील अरेरावी थांबलेली आहे काय? प्रांत आणि प्रदेशाच्या नावावर देशाचे तुकडे झाले आहेत. आजही जर मानवतेच्या नैतिक आणि सरळ मार्गाचा अवलंब केला नाही तर स्थिती आणखीनच स्फोटक होईल.

सर्वोदयी नेता व विद्वान 'दादा धर्माधिकारी' यांनी दि. २७ जानेवारी १९६१ रोजी मुंबईत भाषण देताना म्हटले होते की, हिंदुंनी प्रांताच्या नावावर भारताच्या अक्षरश: ठिकऱ्या उडविल्या. त्यांनी याप्रसंगी असेही म्हटले की, एखाद्या भाषेस जेव्हा शासकीय भाषेचा दर्जा देण्यात येतो, तेव्हा ती राजसिंहासनावर बसून महाराणी होते. मग ती माता राहत नाही. तिचे दूध अटून जाते आणि ती इतर भाषांना आपली सवत समजू लागते.

खरी मानवता आणि देशाच्या कल्याणाचा केवळ एकच मार्ग आहे आणि तो म्हणजे भारताच्या नंदनवनात प्रत्येक भाषा, प्रत्येक सभ्यता व संस्कृती आणि समस्त परंपरांची फुले बहरण्याची संधी उपलब्ध व्हावी. हे नंदनवन जणू सर्वच फुलांची माता असावी आणि हिला कोणाची सख्खी तर कोणाची सावत्र आई समजता कामा नये. या मातेच्या सर्वच मुलांनी भावंडाप्रमाणे प्रेम व बंधुभावाने शांतीपूर्णरित्या एकमेकांच्या खांद्याला खांदा लावून देशाच्या या निसर्गरम्य नंदनवनात मानवता आणि बंधुभावाचे वातावरण निर्माण करण्याचे प्रयत्न करावे. आपसांमध्ये स्पर्धासुद्धा अवश्य असावी, मात्र ही स्पर्धा इर्ष्येचे स्वरुप धारण करता कामा नये. नेकी, सदाचार, सत्यता, अहिंसा, नैतिकता आणि मानवतेचा सुगंध निर्माण करण्यातच स्पर्धा असावी. याउलट इर्ष्यालू भावनेतून स्वार्थाच्या मागे धावताना इतरांना धक्काबुक्की करून आणि इतरांच्या भावना पायदळी तुडवून वा इतरांना मागे लोटून पुढे धावणे हे मानवतेविरुद्ध घोर पाप आहे.

या पुस्तिकेच्या माध्यमाने मानवतेच्या त्याच मार्गाचे प्रवेशद्वार उघडण्याचा आणि अंधाऱ्या मार्गात प्रकाश दाखविण्याचा प्रयत्न करण्यात येत आहे, जो मानवतेच्या स्थापनेच्या उद्दिष्टपूर्तीमध्ये मोलाचे सहकार्य सिद्ध होईल आणि हिंदू असो वा मुस्लिम, अथवा इतर कोणीही असो, ज्यांच्या अंत:करणात मानवतेचा खरा कळवळा आणि करुण सहानुभूती असेल, ज्यांना आपल्या देशात मानवतेचे सुंदर नंदनवन निर्माण करायचे असेल, त्या सर्वांनाच मानवतेच्या राजमार्गाचे दर्शन या पुस्तिकेच्या माध्यमाने घडेल. या पुस्तिकेमध्ये हिंदूधर्म आणि इस्लाम या दोहोंच्या एकत्र शिकवणी प्रस्तुत करण्यात आल्या आहेत, जेणेकरून दोन्ही धर्मांच्या अनुयायांनी हार्दिक संतुष्टता आणि पूर्ण विश्वासासहित या शिकवणी आत्मसात करून देशात खऱ्या मानवतेचे नंदनवन निर्माण करण्यासाठी अहोरात्र प्रयत्न करावे. ही पुस्तिका देशातील समस्त भाषांमध्ये प्रकाशित करण्याचीदेखील गरज आहे.

या पुस्तिकेमध्ये 'मानवी मूल्यांच्या उत्थानात इस्लामी मूल धारणांचे योगदान (हिंदी)' नावाचे प्रकरण 'मुहम्मद जैनुल आबिदीन' यांनी लिहिलेले असून याव्यतिरिक्त इतर मजकूर 'अबू मुहम्मद इमामुद्दीन रामनगरी' यांनी लिहिलेला आहे. ईश्वरदरबारी प्रार्थना आहे की, ही पुस्तिका मानवतेच्या स्थापनेत यशस्वी सिद्ध व्हावी. (आमीन!)

– प्रकाशक

# प्रकरण पहिले

# मानवतेचा राजमार्ग

**(लेखक : अबू मुहम्मद इमामुद्दीन रामनगरी)**

सर्व स्तुती आणि वंदना त्या एकमेव ईश्वरासाठी आहे. जो समस्त सृष्टीचा अस्तित्वदाता, पालनकर्ता, अत्यंत दयाळू आणि कृपाळू आहे. त्याचप्रमाणे ते सर्वच महापुरुष त्याच्या दया आणि कृपेस पात्र आहेत, जे प्रत्येक देशात, प्रत्येक काळी ईश्वराकडून मानवतेचा खरा संदेश देण्यासाठी आलेत आणि मानवांना मानवतेच्या खऱ्या मार्गावर चालण्याची वाट दाखविली.

मानवता ही कधीही स्वत:हूनच जन्म घेत नसते आणि स्वत:हून नष्टही होत नसते. मानवता निर्माण होण्याचा एक स्त्रोत असून या स्त्रोताशी जोपर्यंत मानवतेचा संबंध जुळलेला असतो, तोपर्यंत तिचे अस्तित्व असते, तिची प्रगती आणि विकास होत असतो. जेव्हा या मूळ स्त्रोताशी तिचा संबंध तुटून जातो, तेव्हा ती कोमेजून जाते आणि शेवटी सुकून-करपून जाते, नष्ट होऊन जाते, ही एक वस्तुस्थिती आहे. जोपर्यंत ही वस्तुस्थिती स्वीकारली जाणार नाही आणि यानुसार कार्य केले जाणार नाही, तोपर्यंत या शेवटच्या घटका मोजणाऱ्या मानवतेस मृत्यूच्या जबड्यातून बाहेर काढणे शक्य होणार नाही. याउलट इतर सर्वच प्रयत्न केवळ निष्फळच ठरणार नसून मानवतेस आणखीन जास्त मृत्यूच्या जबड्यात ढकलण्यासम ठरतील. शिवाय अशा प्रकारचे उलटे प्रयत्न सध्या होण्याचे दुर्भाग्य आपण आपल्या डोळ्यांनी पाहतही आहोत.

वस्तुतः मानवजीवनाचे दोन परस्परभिन्न आधार व धारणा आहेत. यापैकी एक धारणा नैसर्गिक तर दुसरी अनैसर्गिक आहे. दुसऱ्या शब्दांत एक धारणा ही मानवी तर दुसरी धारणा पाशवीक होय. सामान्य शब्दांत एकीस धार्मिक तर दुसरीस भौतिक असेही म्हणता येईल. धार्मिक विश्वास हा मुळात मानवतेचा स्त्रोत असून भौतिकवाद हा अमानवीयतेचे उगमस्थान आहे. माझा हा दावा केवळ कल्पनावृक्षावरील कल्पफलिते नसून यामागे बौद्धिक तर्क आणि स्पष्ट अनुभव आहेत. आता आपण खालील उपप्रकरणात धार्मिक विश्वास आणि भौतिक विश्वास या दोन विषयांचा थोडक्यात उहापोह करू या.

## १) धार्मिक विश्वास

ईश्वर आहे! तोच या सृष्टीचा अस्तित्वदाता, पालनकर्ता, रक्षक आणि स्वामी आहे. त्यानेच मानवजीवनासाठी अनंत साधनसामग्री निर्माण केली असून यापासून लाभ उचलण्याची मानवास असाधारण शक्ती आणि ज्ञान प्रदान केले आहे. त्याचप्रमाणे त्याने आपल्या संदेशदूत आणि प्रेषित अगर पैगंबरांच्या माध्यमाने सृष्टीतून या साधनसामुग्रीचा लाभ उठविण्याची आणि सत्यमार्गावर जीवन जगण्याची पद्धत प्रत्येक काळात आणि प्रत्येक देश व भूभागात प्रदान केली. याच विश्वासाला आपण एकेश्वरत्व आणि प्रेषितत्व असे म्हणतो. या विश्वासाचा अथवा श्रद्धेचा आणखीन एक पैलू आहे. तो असा की, या ऐहिक जीवनानंतर आणखीनही एक जीवन आहे. म्हणजेच मृत्यू हे या जीवनाचा अंत नसून आणखीन एका जीवनाचा आरंभबिंदू आहे. या दुसऱ्या जीवनात ईश्वर ऐहिक जीवनातील प्रत्येक भल्याबुऱ्या कर्माचा कसून हिशेब घेईल. ज्या व्यक्तीची कर्मे त्याने घालून दिलेल्या नियमांनुसार असतील, तिच्यावर तो प्रसन्न होईल आणि त्यास सुख-शांतीची अशी कायमस्वरुपी साधनसामुग्री देईल की ऐहिक जीवनात कोणीही याची साधी कल्पनादेखील करु शकत नाही. ही सुखशांती खरे पाहता मानवी कल्पनांच्या क्षितिजापुढील बाब होय. याउलट ज्या व्यक्तीने ईश्वरी नियम आणि आदेशांना धाब्यांवर बसवून जीवनाची वाटचाल केली, त्यांना अशी शिक्षा देईल, जिची साधी कल्पनाही कोणी करू शकत नाही. यालाच परलोकत्व असे म्हणतात.

हाच विश्वास आणि श्रद्धा मुळात इस्लामचा आधार असून प्रत्येक धर्मामध्ये याचा काही ना काही अंश कोणत्यान् कोणत्या स्वरुपात अजूनही आढळतो. एवढेच नव्हे तर परलोक आणि कर्मफळ मिळण्याची श्रद्धा हिंदू धर्मात व वैदिकधर्मातसुद्धा आढळते. या धारणांवर विचार करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीस हे मान्य करावेच लागणार की, मुळात याच धारणा मानवतेचा मूळ स्त्रोत असून येथूनच मानवता उगम पावते,. तुम्हीच विचार करा की मानवता म्हणजे शेवटी काय आहे? मानवतेची खरी व्याख्या काय आहे? थोडासा विचार केल्यावर ही बाब आपोआपच स्पष्ट होईल की, दायित्वाची अनुभूती आणि जबाबदारीची जाणीव हाच मानवतेचा मूळ आधार आहे. माणसात आणि पशू-पक्ष्यात याच दायित्व आणि जवाबदारीच्या जाणिवेचा स्पष्ट फरक आहे. कारण पशुपक्ष्यात हीच जाणीव नसते. त्यांना फक्त त्यांचा स्वार्थ, गरजा आणि इच्छा व अभिलाषा पूर्ण करायच्या असतात, त्या ते पूर्ण करतातही. अशीच

जर अवस्था मानवाची असेल तर माणूस आणि जनावरात फरकच काय? यालाच पाशविक मनोवृत्ती अगर मानसिकता म्हणतात. दुसऱ्या शब्दांत यालाच भौतिकवादी जीवन असे म्हणतात. याउलट परलोक, कर्मांचे फळ आणि कर्मांची शिक्षा असण्याच्या श्रद्धेमुळे माणसात उत्तरदायित्व आणि जवाबदारीची जाणीव आणि अनुभूती निर्माण होते व याच आधारे अगर यानुसार त्याने केलेल्या जीवनाची वाटचाल निश्चितच मानवतेच्या उंच शिखरावर पोचविणारी असे. हे शक्यच नाही की जो माणूस ईश्वराच्या आदेश आणि नियमानुसार, परलोक आणि ईश्वरासमक्ष आपल्या भल्या-बुऱ्या कर्मांचा जाब देण्यावर विश्वास ठेवून जीवन जगत असेल आणि तरीदेखील तो उचित-अनुचितचा विचार करीत नसेल. एका ईश्वरावर आणि परलोकी जीवनात आपल्या कर्मांचा हिशेब देण्यावर विश्वास ठेवणारा माणूस निश्चितच न्याय-अन्यायाचा, सत्य-असत्याचा, ईमानदारी-बेईमानीचा विचार करूनच आपले पाऊल उचलणार. इतरांना धोका देणे, विश्वासघात करणे, लाच घेणे, भ्रष्टाचार करणे, इतरांचे अधिकार हिरावून घेणे, अन्याय व अत्याचार करणे, अशांती आणि हिंचासार माजविणे, व्यभिचार व लैंगिक शोषण करणे तसेच अशा प्रकारच्या सर्वच अमानवी कर्म करण्यासाठी तो मुळीच धजावणार नाही. त्याचे विचार आणि आकांक्षासुद्धा मलीन होणार नाहीत. तो इतरांना कधीही त्रास देणार नाही. इतरांना दुःख वा त्रास झाल्यास त्यांच्या मदतीस धावून जाईल. सर्वांशीच प्रेम आणि बंधुभावाने वागेल. दीन-दलित आणि शोषित व अत्याचारपीडितांच्या कल्याणासाठी अहोरात्र झटेल, असत्याचा व अन्याय-अत्याचाराचा समूळ नायनाट करण्यासाठी कंबर कसेल. मानवी स्वभावानुसार त्याच्यात काही त्रुटी निर्माण होऊन अथवा आपल्या इच्छा आणि अभिलाषांच्या आहारी जाऊन त्याच्याकडून एखादे अनुचित कार्य घडणार असेल तर त्याच्या आतील श्रद्धा आणि धारणा त्यास यापासून परावृत्त ठेवील आणि त्याचे दुष्कर्मांकडे पाऊल पडणार नाही.

ही काही अथवा कल्पनाविलास नसून मानवी इतिहासाचे असे सत्य आहे, ज्याकडे कोणीही दुर्लक्ष करण्याचे धैर्य आजपर्यंत दाखविले नाही. या जगाने वारंवार हे दृश्य पाहिलेले आहे. प्रत्येक काळ आणि प्रत्येक देश व राष्ट्रात असे प्रेषित आणि महापुरुष आलेत, ज्यांनी याच धारणांवर आधारित समाजाची उभारणी केली आणि आदर्श मानवसमाजाची स्थापना केली.

## २) भौतिकवाद

वर उल्लेखण्यात आलेल्या धार्मिक श्रद्धेविरुद्ध असलेला सिद्धान्त हा भौतिवाद होय. हा सिद्धान्त असा आहे की ईश्वराचे अस्तित्व वगैरे काहीही नाही. ही सृष्टी आपोआपच अस्तित्वात आलेली आहे. माणसाचे जीवन हे मृत्यूपर्यंतच मर्यादित असून यापुढील असलेले परलोकी जीवन वगैरे काहीही नाही. या सृष्टीत जन्म घेतलेल्या कोणत्याही माणसाला आपल्या कर्माचा जाब देण्याचा प्रश्नच नाही. या जीवनानंतर परत कोणत्याही पारलौकिक जीवनाचे अस्तित्व ही केवळ कल्पना आणि अंधश्रद्धा होय. माणसाला हेच एकुलते एक जीवन प्राप्त असून याच जीवनास हवे त्याप्रमाणे आणि वाटेल तसे जास्तीतजास्त चांगल्यारितीने जगण्याचा प्रयत्न करावा. याच जीवनास यशस्वी करावे.

उपरोक्त भौतिकवादी सिद्धान्त हा मुळातच अमानवी असणे अगदी स्पष्ट आहे. कारण जीवन जगण्याचा असाच मर्यादित सिद्धान्त असेल तर माणूस हा माणूस राहणार कसा आणि त्यात माणुसकी येण्याचा प्रश्नच कोठे निर्माण होतो? त्यास या माणुसकीशी घेणेदेणेच काय? कोणत्याही नैतिक कामाशी त्याचा संबंधच काय? एखादे कर्म करण्यापूर्वी ते चांगले-वाईट, न्यायोचित-अन्यायी असण्याच्या विचारांना कशासाठी थारा देईल? कशासाठी, कोणासाठी कोठवर रेटायचा असा गाडा ईमानाने जन्मभर, असे म्हणत तो आपला अन्यायी गाडा वाटेल त्या मार्गाने घेऊन जाणार आणि वाटेत येणाऱ्या प्रत्येकाचे झोपडे मोडणार. अगदी श्वापदाप्रमाणे केवळ आपल्या इच्छदेवतेस प्रसन्न करण्यासाठी इतरांचा बळी चढविणार, लाच-लुचपत, घोटाळे, भ्रष्टाचार, व्यभिचार, बलात्कार, रक्तपात, अरेरावी, हिंसाचार आणि ना-ना प्रकारे आपल्या स्वार्थ व अभिलाषांच्या देवी-देवतांना प्रसन्न करण्यासाठी मानवतेचे वस्त्रहरण करून तिची कंदुरी करणार, सत्ता-संपत्तीच्या लालसेपोटी मानवा-मानवांत धर्म, जात-पात आणि भाषा व प्रांतवादाच्या नावावर रक्तपात घडविणार, कायद्याचा गैरवापर करणार; आपल्या संगमश्वरी भावना आणि स्वैर अभिलाषांच्या पाषाणांवर निर्धन, दीन-दुबळ्यांची डोकी आपटून त्यांना ठार करणार, मतदारांना पैसे देऊन आणि गुंडगिरी करून आमदार, खासदार, मंत्री, मुख्यमंत्री होणार; न्याय आणि कायद्याची धिंड काढणार; आपल्या प्रत्येक इच्छेची आणि अभिलाषेची तहान भागविण्यासाठी वाटेल त्याचा आणि वाटेल त्या पद्धतीने बळी देणार, मानवसमाजाचे हेच विदारक आणि आत्म्यास तळमळायला लावणारे चित्र आपण दररोज, आपल्या डोळ्यांनी

पाहत आहोत. गल्ली ते दिल्लीपर्यंत आणि जगाच्या पाठीवर सर्वत्र याच वातावरणाचे आपल्याला दर्शन घडत आहे. हे सर्वकाही याच भौतिकवादी सिद्धान्तांची अवलाद आहे. या अमानवीयता आणि पाशविकतेमुळे लोक मानवता आणि नैतिकतेचा अर्थ हरवून बसले आहेत. मानवता आणि नैतिकता ह्या केवळ ऐतिहासिक घटना होऊन बसल्या आहेत. आज कोणी या गोष्टींवर विश्वास करायलासुद्धा तयार नाही. परिस्थिती इतकी विस्फोटक झालेली आहे की अशा गोष्टी करणाऱ्यांना मूर्खात काढून त्याची टर उडविण्यात येत आहे. आज मानवतेचे वस्त्रहरण करून तिला अंतिम घटका मोजताना आपण आपल्या डोळ्यांनी पाहत आहोत आणि तिच्या आर्त टाहो फोडण्याच्या आवाजावर तिच्या मदतीसाठी धावून जाणाऱ्यांची कोणी साथ द्यायला तयार नाही.

ज्या सज्जन आणि न्यायनिष्ठ लोकांच्या हृदयात मानवतेचा कळवळा आहे, ज्यांना मानवतेस मृत्यूच्या जबड्यातून मुक्त करण्याची खरी चिंता आहे, त्यांनी ही बाब चांगल्यारितीने लक्षात घ्यावी की जोपर्यंत माणूस भौतिकवादास कायमची मूठमाती देऊन ईश्वरवादाचा स्वीकार करणार नाही तोपर्यंत मानवतेस मृत्यूच्या पाशवी जबड्यातून मुक्त करणे शक्य होणार नाही. कारण मानवता जीवित ठेवायची असेल तर 'ईश्वरत्व' या मूळ स्त्रोताशी तिचा संबंध जोडणे आवश्यक आहे. कारण जी वस्तु तिच्या मूळ उगमस्थानापासून विभक्त होते, ती करपून आणि सुकून जाते, नष्ट पावते आणि मानवतेचा मूळस्त्रोत हा ईश्वरत्वच असून भौतिकवाद मानवतेसाठी एक अत्यंत विषारी रसायण होय, हीच वस्तुस्थिती आहे. आज जगात मोठमोठ्या विद्वान, ज्ञानी आणि विचारवंतांचा सर्वत्र डंका वाजत आहे. मात्र त्यांना या वस्तुस्थितीचा सर्रास विसर पडलेला असून यामुळेच त्यांना मानवता जीवित करण्यात यश मिळत नाही. ही गोष्टही खरी आहे की, त्यांना मानवतेप्रति सहानुभूती आणि प्रेम आहे. मात्र केवळ सहानुभूती आणि प्रेम असल्याने चालत नाही. तर यासाठी सहानुभूती आणि प्रेमाबरोबरच रोगाचे मूळ ओळखून योग्य उपचार करावा लागतो, तरच रोगी बरा होणे शक्य आहे. कारण रोग्याशी केवळ प्रेम आणि सहानूभुतीने विषारी रसायन हे अमृत होत नसते. चुकीच्या मार्गाने केलेले उपचार रोग्यास आणखीनच जास्त मृत्यूच्या दाढेत नेऊन टाकते.

# वास्तविकत रोग आणि त्याचे निवारण

ज्यांना अधापही रोगाची वास्तविकता समजलेली नाही. ते मोठ्या भ्रमात पडलेले आहेत. म्हणून त्यांचा भ्रम दूर करण्याची नितांत आवश्यकता आहे. ही मोठी दुःखाची बाब आहे की आज धार्मिकांची अवस्थादेखील भौतिकवाद्यांसारखीच झालेली आहे. म्हणूनच आज सामान्यजन असे म्हणताहेत की, "धर्माला स्वीकारून अथवा नाकारून काहीही साध्य होत नसते. कारण धर्मवाद्यांमध्येसुद्धा भौतिकवाद्यांत असलेला प्रत्येक दुष्कर्म आहे! दोघांपैकी कोणीही दुष्कर्मात एक पाऊलसुद्धा मागे नाही." खरे पाहता हा एक भ्रम आणि जबरदस्त धोकाच होय. खरी बाब अशी आहे की, भौतिकवादी अगर निधर्मवाद्यांमध्ये जी दुष्प्रवृत्ती आपल्याला आढळून येते, ती मुळात त्यांच्या चुकीच्या सिद्धान्ताचे फलित आहे. वस्तुतः हे सिद्धान्तच असे आहेत, जे माणसात मानवता निर्माण करण्याऐवजी पाशविक स्वभाव आणि दुष्टप्रवृत्ती निर्माण करतात. मात्र धर्मवादी लोकांमध्ये ज्या दुष्प्रवृत्ती आपणास दिसून येतात, त्या त्यांच्या श्रद्धा, विश्वास आणि सिद्धान्तांचे फलित नसून त्या सिद्धान्तानुसार कर्म न करण्याचे दुष्परिणाम अथवा कडू फलित आहे. कारण एखादा माणूस जर धर्मानुसारच जीवनाची वाटचाल करीत असेल तर त्याच्याकडून दुष्कर्म घडणे शक्यच नाही.

आता आपण या विषयावरसुद्धा उघड मनाने आणि मुक्तपणे चर्चा करू या की, आज धर्मवाद्यांची ही दुरावस्था असण्याचे काय कारण आहे? धर्मवादीसुद्धा भौतिकवाद्यांसारखेच का वागतात? हे मानवतेचे मोठे दुर्दैवच म्हणावे लागेल की आजच्या काळात जगातील मोठमोठ्या राष्ट्र आणि शासनांवर केवळ निधर्मी, भौतिकवादी लोकांचेच अधिकार आहेत. काही अशी धर्मवाद्यांच्या हाती सत्ता व शासन असले तरी, हे धर्मवादी केवळ आंशिक स्वरुपाचेच आहेत. उदाहरणार्थ, रशिया, चीन वगैरे कम्युनिस्ट अथवा साम्यवादी देश असून हे धर्माचे कट्टर विरोधक आणि कर्दनकाळ आहेत. याव्यतिरिक्त अमेरिका आणि इंग्लंड वगैरेसारख्या देशांवर धर्मवादी लोकांची सत्ता असली तरी ते केवळ नावापुरतेच धार्मिक आहेत. कम्युनिस्ट अगर साम्यवादी देश आणि कम्युनिस्ट-विरोधी देशातील सामाजिक जीवनात असावा तसा मुळीच फरक नाही. ही गोष्ट कधीही विसरता कामा नये की, केवळ धर्म, ईश्वर, अल्लाह, गॉडचे नाव घेतल्याने आणि मंदिर, मस्जिद, चर्च वगैरेत जाऊन वाऱ्या केल्याने माणूस धार्मिक होत नसतो, तर यासाठी त्यास धर्माच्या नियमांवर जीवन जगावे लागते.

ही गोष्ट आणखीन स्पष्टपणे समजून घेण्यासाठी एक उदाहरण असे देता येईल की, समजा मुस्लिम लोक कुरआन व हदीसवर आणि हिंदू वेदांवर श्रद्धा ठेवतात. दोन्ही धर्माचे लोक आपापल्या प्रार्थनागृहात जाऊन आपापल्या पद्धतीने उपासना वा पूजापाठ करतात. मुस्लिम लोक नमाज पढतात, रोजा ठेवतात, कुरआनचे पठण करतात, जकात देतात, हज करतात वगैरे. याबरोबरच मुस्लिमेतर बांधवसुद्धा आपापल्या धार्मिक ग्रंथांचे पठण करतात, वृत ठेवतात, कीर्तन-जागरण करतात, चर्चमध्ये प्रार्थना करतात वगैरे अर्थातच ही सर्व कामे धर्माच्या नियमानुसार चालतात, होतात. मात्र हेच मुस्लिम, हिंदू अगर इतर धर्मिय लोक व्यावहारिक जीवनात आपापल्या धर्मांच्या नियमांचे पालन करतात काय? मुळीच नाही. हे सर्वच धर्मवादी लोक आपले व्यावहारिक जीवन भौतिकवाद्यांप्रमाणेच व्यतीत करतात. मग यात धर्माचा काय दोष? धर्माचे नियम तर आपल्या ठिकाणी योग्य आहेत. मात्र व्यावहारिक जीवनात या नियमांना पाठमोरे घालून जीवन जगणाऱ्यांचाच यात दोष आहे. म्हणूनच आपल्याला धर्मवादी आणि निधर्मी किंवा भौतिकवाद्यांच्या जीवनात कवडीमात्र फरक दिसत नाही.

या ठिकाणी आणखीन एक विशेष बाब लक्षणीय होय. ती अशी की, प्रत्येक देश, प्रत्येक समाजामध्ये असे बरेच लोक आहेत, जे मानवतेचा ऱ्हास पाहून चिंताग्रस्त आहेत. त्यांना मानवता जीवित व्हावी असे मनापासून वाटते. ते नेक, ईशपरायण, धर्मपरायण आणि सत्यनिष्ठ समाज पाहू इच्छितात. यासाठी ते प्रयत्नदेखील करतात. असे समाजसुधारणेची तळमळ ठेवणारे लोक हिंदू, मुस्लिम आणि इतरही समाजामध्ये आहेत. त्यांना वाटते की, हिंदू-मुस्लिमांनी जातिवाद आणि परस्पर द्वेशभावनेस कायमची मूठमाती देऊन आपापल्या धर्मानुसार जीवन जगावे आणि चांगले मनुष्य व्हावे, मानवतेचा आदर्श निर्माण करावा. मात्र केवळ असा विचारच करून त्यांना गुपचुप हात चोळीत बसावे लागते. यापुढे त्यांना काही करता येत नाही. कारण त्यांच्या हाती शासन व सत्ता नाही. म्हणूनच अशा सज्जन हिंदू आणि मुस्लिमांनी एकत्र येऊन मानवतेस जीवित करण्यासाठी व मानवतेचा आदर्श निर्माण करण्यासाठी यशस्वी प्रयत्न करावे. हाच मूळ हेतू समोर ठेवून या पुस्तिकेमध्ये आम्ही हिंदू धर्म आणि इस्लाम धर्म, या दोहोंच्या मानवतावादी शिकवणी वाचकांच्या आणि मानवतेप्रति अश्रू ढाळणाऱ्यांच्या सेवेत सादर करीत आहोत.

## प्रकरण दुसरे

# वेदांमध्ये हिंदू धर्माची मानवतावादी शिकवण

'ऋग्वेद भाष्य की भूमिका' (हिंदी)

लेखक : श्रीराम शर्मा आचार्य, 'वैदिक उपदेश'

लेखक : श्री महाराज पितांबर पीठ दत्या.

'मानवधर्म' - लेखक : श्री हनुमान प्रसाद पोद्दार आणि मुहम्मद फारूख़ खान लिखित 'वेद और कुरआन' (हिंदी) मध्ये मानवतासंबंधी जी सामुग्री उपलब्ध झाली तीच आम्ही येथे क्रमशः प्रस्तुत करीत आहोत. या पुस्तकात जे काही वैदिक, पौराणिक व इतर श्लोकांचा उल्लेख आहे, त्यांचा मराठीत भावानुवाद त्याच पुस्तकातील हिंदी अनुवादावरून देत आहोत. सर्वप्रथम 'श्रीराम शर्मा आचार्य' यांच्या 'ऋग्वेद भाष्य की भूमिका' तून येथे सुरुवात करीत आहोत...

"मोघमन्नं विन्दते अप्रचेताः सत्यं, ब्रविमि वध इत स तस्य।
नार्थमषं पुण्यति नो सखायं, केवलाघो भवती केवलादी।।"

(ऋग्वेद : १०, ११७,६)

अर्थात : "ज्याचे मन उदार नसेल, त्याचे भोजन वृथा आहे. त्याचे भोजन करणे हे त्याच्या मृत्यूसमान आहे, जो ना देवगणांना परोपकारार्थ देतो, ना मित्रांना देतो, जो स्वतःच भोजन करतो, तो केवळ पापच खातो."

या मंत्रामध्ये लोककल्याणाची शिकवण देण्यात आलेली आहे. समाजामध्ये श्रीमंत आणि दरिद्री या दोन्ही प्रकारचे लोक असतात. श्रीमंताचे हे कर्तव्य आहे की, त्यांनी केवळ स्वतःच सुखविलासात न राहता गरीब, दीन-दुबळे आणि निर्धनांचासुद्धा विचार करावा. हीच शिकवण कुरआनात अशा शब्दांत देण्यात आली आहे,

"श्रीमंतांच्या संपत्तीमध्ये याचक आणि वंचितांचासुद्धा अधिकार आहे!"

(संदर्भ : कुरआन - सूरह-ए-जारियात)

त्याचप्रमाणे यजुर्वेदात म्हटले आहे की,

"ईशा वास्यमिदघं सर्व यत्किंच जगत्यां जगत।
तेन व्यक्तेंत भुञ्जीथ मा गृधः कस्य स्विद्धनम्।।
कुर्वन्नेह कर्माणि जिजीविषेच्छतघं सभाः।
एवं त्वयि नान्यथोते स्ति न कर्म लिप्यते नरे।।" (यजुर्वेद : ४०:१,२)

अर्थात : "या जगामध्ये परमात्म्यास सदैव सर्वत्र उपस्थित समजून कोणाच्याही धनाचा लोभ बाळगू नका आणि त्याने जेवढे धन न्यायानुरुप तुम्हांस प्रदान केले आहे, त्यातच उदरनिर्वाह करा. याच मार्गावर आजीवन चालल्यास मोक्ष मिळू शकते. याशिवाय इतर कोणताही उपाय नाही."

या मंत्रावरून हेच सिद्ध होते की मानवजीवनाचे मुख्य ध्येय हे मोक्षप्राप्ती असून माणसात संतुष्टी व समाधान नसेल तर त्यास प्राप्त असलेल्या उपजीविकेच्या साधनांवर त्यास समाधान मुळीच होणार नाही. इतरांची संपत्ती पाहून त्याची लाळ पडेल आणि लोभापायी तो भल्या-बुऱ्या कोणत्याही मार्गाचा अवलंब करील. यामुळे त्यास मोक्षप्राप्तीपासून वंचित व्हावे लागेल आणि परिणामी नरकातील यातना भोगाव्या लागतील. या लोभापासून स्वत:चे रक्षण करण्याचे भक्कम कवच-कुंडले म्हणजे ईश्वरावर आणि आपल्या कर्मांच्या फलितांवर पूर्ण विश्वास ठेवणे होय. मात्र आज माणसासमोर ईश्वर नव्हे तर संपत्ती महान व पूज्य ठरलेली दिसत असून माणूस ईश्वराचा भक्त होण्याऐवजी पैसा आणि धनसंपत्तीचा भक्त झालेला दिसतो. वैदिक काळातसुद्धा अशी माणसे असण्याचा उल्लेख निम्नलिखित श्लोकावरून स्पष्ट होते.

"एकपादभूयो द्विपदो वि चक्रमे द्विपात्, त्रिपादमभ्येति पश्चात।
चतुष्पोदति द्विपदामभिस्वरे संपश्यन्, पडक्तीरुपतिषअठमान:॥"

(ऋग्वेद : १०-११७-८)

अर्थात : "एकपट संपत्ती राखणारा आपल्यापेक्षा दुप्पट संपत्ती बाळगणाऱ्या मार्गावर आक्रमण करतो, दुप्पट संपत्ती बाळगणारा तिप्पट संपत्तीवाल्याच्या मागे धावतो आणि चौपट संपत्ती बाळगणारा आपल्याहून दुप्पट संपत्ती बाळगणाऱ्याच्या महत्ता प्राप्त करण्याची इच्छा बाळगतो. म्हणजेच प्रत्येकजन आपल्यापेक्षा अधिक श्रीमंतास पाहून त्याची बरोबरी करण्याची इच्छा बाळगतो."

अगदी हेच चित्र आजच्या परिस्थित आपल्याला सर्वत्र पाहायला मिळत आहे. संपत्ती ही एक शक्तीसुद्धा असून संपत्ती मिळविण्याचे साधनसुद्धा आहे. ज्यांच्याकडे संपत्ती आहे त्यांच्याच हाती संपत्ती कमावण्याचे साधनसुद्धा आहे. म्हणूनच आज धनाड्यांच्या हाती मोठमोठे उद्योग आणि व्यवसाय आहेत. ते आपली उत्पादने आणि वस्तू मनमानी व अवाजवी दराने विकत आहेत आणि (मुकी बिचारी जनता, कुणीही हाकाचीच स्थिती असलेली) जनता त्यांनीच ठरविलेल्या अवाढव्य दरानुसार वस्तु खरेदी करण्यासाठी बाध्य आहे. अशा प्रकारे एकपट संपत्ती असलेले दिवसेंदिवस

दुप्पट आणि दहापट संपत्ती मिळवून गब्बर होत आहेत. जनतेची कष्टाची आणि घामासह रक्त गाळून केलेली कमाई जीवनावश्यक वस्तुंच्या बदल्यात धनाढ्यांच्या तिजोरीत जात आहे. इकडे गरिबांचे खिसे रिकामे होत आहेत आणि धनाढ्यांच्या तिजोऱ्या भरत आहेत. जनता मात्र दुरावस्थेच्या दारिद्र्यात होरपळून निघत आहे. याचा आणखीनही एक दुष्परिणाम आहे आणि तो म्हणजे अशा या विषम अर्थव्यवस्थेमुळे महागाई प्रचंड वाढते आणि जनतेच्या सुखशांतीची महागाईच्या आगीत होळी होत असते. गब्बर मंडळी मात्र दररोज आणि प्रत्येकक्षणी शिमगा खेळत असते.

"समानी प्रपा सह वोन्न भाग: समाने योक्त्रे सह वो युनज्मि।

सम्यञ्चोग्निं सपर्यतारा नाभिमिवाभित:।" (अथर्ववेद : ३-३०-६)

अर्थात : तुम्हा सर्व मनुष्यांचे जलस्थळ समान, तुम्ही सर्वजण समान अन्न परस्पर वाटून घ्या. मी तुम्हा सर्वांना एकाच बंधनात बांधत आहे. म्हणून तुम्ही (सर्वजण) मिळून कर्म करा, जसे रथाची सगळी चाके एकाच नाभीत फिरतात."

या मंत्रामध्ये ऋषींनी समाजास सुखसमाधानाची नीती दाखविली आहे. आपल्या सुखाची चिंता सोडून इतरांची चिंता केल्याने समाजामध्ये सुखशांती नांदते, तसेच सामाजिक जीवन असे असावे जणू सर्वत्र मानव एका परिवाराचे सदस्य आहेत आणि सर्वांचे सुख-दुःख, नफा-तोटा एकच आहे.

"दृते दृघंह मा मित्रस्य मा चक्षुका, सर्वाणि भूतानि समीक्षन्ताम।

मित्रस्याहं चक्षुषा भूतानि समिक्षे, मित्रस्य चक्षुषा समीक्षामहे।।"

(यजुर्वेद : ३६ - १८)

अर्थात : "हे परमात्मा! माझी दृष्टी दृढ कर, जेणेकरून सर्व प्राण्यांनी मला मैत्रीच्या दृष्टीने पाहावे आणि मीसुद्धा सर्व प्राण्यांना मैत्रीच्या दृष्टीने पाहावे, त्याचप्रमाणे आम्ही सर्वांनीच एकमेकांना मैत्रीच्या दृष्टीने पाहावे."

थोडा विचार करून पाहिल्यास हे मंत्र प्रार्थनाही आहे आणि शिकवणसुद्धा आहे. आपल्याकडे नसलेल्या बाबीची आपण ईश्वरास मागणी करतो. ती वस्तु केवळ ईश्वराच्या दयेनेच आपल्याला मिळू शकते. मात्र त्या मागणीप्रति आपलेही काही कर्तव्य असते. आपल्याकडे जर संपत्ती नसेल तर आपण ईश्वराकडे मागणी करतो की, हे ईश्वरा! आम्हास श्रीमंत वा धनवान कर. मात्र संपत्ती प्रदान करण्यासाठी ईश्वर आपल्या दूतामार्फत काही सोन्या-चांदीच्या नाण्यांनी भरलेले गाठोडे पाठवित नसतो किंवा असेही

होत नाही की, प्रार्थना केल्यावर आपण झोपी जातो व सकाळी उठून पाहिल्यास सगळे घरच पैशांनी व साहित्यांनी भरलेले आहे. तर याकरिता आपणास परिश्रम आणि कष्ट करावे लागणारच. आपले सामर्थ्य आणि योग्यतेचा, तसेच आपल्याकडील साधनसामुग्रीचा निश्चितच वापर करावा लागेल. त्याचप्रमाणे आपल्याला जर अशी दृष्टी हवी असेल की, आपल्याला सर्वांनी सहानुभूतीच्या वा मैत्रीच्या दृष्टीने पाहावे तर याकरिता निश्चितच याला अनुसरून वागावे लागेल. आपलाही इतरांच्या प्रति मैत्री आणि सहानुभूतीचा व्यवहार असावा लागेल. यासाठी आपण संकोचित वृत्तीस आणि द्वेश व मत्सरास मूठमाती देऊन उदारता दाखवावयास हवी. आपल्या हिताप्रमाणेच इतरांचेही हित पाहावे लागणार. परोपकार आणि सर्वांच्या प्रति स्नेह, बंधुभाव आणि सहकार्याची भावना ठेवावी लागणार. आपल्यासाठी जे योग्य आणि प्रिय असते, तेच इतरांसाठीही पसंत करावे लागणार. आपण आपल्याकरिता जे पसंत करीत नाही, ते इतरांसाठीदेखील पसंत करता कामा नये. आपले आचरण असे असेल तर निश्चितच इतर सर्वजण आपल्याला प्रेम आणि सहानुभूतीच्या दृष्टीने पाहतील. आपण इतरांचे हित जोपासण्याचा व इतरांना मदत करण्याचा प्रयत्न केल्यास आपणही सर्वांचे लाडके ठरू आणि आपल्याला काटा जर रुतला तर इतर सर्वांनाच वेदना होतील व ते आपल्या मदतीसाठी धावून येतील. मात्र जर आपले आचरणच याविरुद्ध असेल तर मैत्री व प्रेमाच्या दृष्टीने पाहणे तर सोडाच आपल्याला कुत्रीही हुंगणार नाही. केवळ प्रार्थना करून बसल्याने व आचरणशून्य तसेच सहानुभूतीशून्य वागून आपोआपच घरी बसल्या-बसल्या काहीही मिळणार नाही. आपली दे रे हरी, पलंगावरी, ऐती पुरी, वरच्यावरीची प्रार्थना ईश्वर काही स्वीकारणार नाही.

हे तर झाले प्रार्थनेपुरते! मात्र प्रश्न असा आहे की, आपण इतरांना व इतरांनी आपल्याला मैत्री व सहानुभूतीच्या दृष्टीने पाहण्याची चिंता कित्येकांना असेल? सगळेजण केवळ आपलेच हित पाहताहेत, सर्वजण आपल्या पोळीवर तूप ओढून घेताहेत. प्रार्थना, याचना हे तर ईश्वर आणि धर्माशी संबंधीत असून हा काळ अनिश्वरवादी व भौतिकवादी आहे. प्रसिद्ध अनिश्वरवादी अथवा नास्तिक पुढाऱ्यांनी असा सिद्धान्तच मांडला आहे की, 'धर्माने ज्या गोष्टींना सदाचार, दुराचार, पाप आणि पुण्य ठरविले, ते आम्हांस मान्यच नाही. सदाचार-दुराचार आणि नैतिकता-अनैतिकतांचा मूळ आधार आपले हित, लाभ आणि स्वार्थ असून ज्यामुळे यांची प्राप्ती होते, तेच सदाचार आणि नैतिकता होय.' काही अपवाद वगळता धार्मिकवर्गसुद्धा याच आधूनिक सिद्धान्तानुसार आचरण करीत आहे.

तो जाणूनबुजून अथवा नकळत अशा भ्रमावस्थेत पडला आहे की, धर्म हे केवळ पूजापाठ, स्नान, देवदर्शन अगर देवाच्या मूर्तीला सोण्याचा घंगाळ अर्पण करणे अगर एखाद्या देवस्थानास मूर्तीच्या मिरवणुकीसाठी कोट्यवधींचा सोन्याचा रथ अर्पण करणे, मूर्तीला नोटांचा हार घालणे एवढेच होय. याव्यतिरिक्त आपण मनाला वाटेल तिकडे तोंड मारावे, धर्माचा यावर काहीही आक्षेप नाही.

'श्रीरामजी शर्मा आचार्य' यांनी वरील मंत्राची व्याख्या करताना म्हटले आहे की, वेदांचा आदर्श आत्मवत सर्व भूतेषु आणि वसुधैवकुटुम्ब नुसार आहे. ज्ञानप्रेमी आणि न्यायनिष्ठ वाचकांना हे वाचून आनंद होईल की, कुरआनानेसुद्धा हाच आदर्श सादर केला आहे. ईश्वराने कुरआनात स्पष्टपणे म्हटले आहे,

"लोकहो! आम्ही तुम्हाला एका पुरुष व एका स्त्रीपासून निर्माण केले आणि मग तुमची राष्ट्रे आणि कबिले बनविली जेणेकरून तुम्ही एकमेकांना ओळखावे. वस्तुत: अल्लाजवळ तुमच्यापैकी सर्वांत जास्त प्रतिष्ठित तो आहे जो सर्वांत जास्त ईशपरायण आहे. निश्चितच अल्लाह सर्वकाही जाणणारा आणि खबर राखणारा आहे." (कुरआन - ४९:१३)

कुरआनात आणखीन एके ठिकाणी म्हटले आहे की, "लोकहो, उपासना (भक्ती) करा आपल्या पालनकर्त्याची ज्याने तुम्हाला आणि तुमच्या पूर्वींच्यानाही निर्माण केले, जेणेकरून तुम्ही दुष्कृत्यांपासून परावृत्त राहू शकाल." (कुरआन - २:२१)

त्याचप्रमाणे प्रेषित मुहम्मद (स.) हे पाचही नमाजीनंतर प्रार्थना करीत असत,

"हे ईश्वर! मी साक्ष देतो की एक तूच प्रभु आहेस! हे ईश्वर! मी साक्ष देतो की मुहम्मद (स.) तुझा बंदा (दास आणि भक्त) व प्रेषित आहे. हे ईश्वर! मी साक्ष देतो की प्रत्येक मानव एक दुसऱ्याचा बंधु आहे!" (संदर्भ : अहमद, अबूदाऊद - हदीसग्रंथ)

आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी या ठिकाणी असे मुळीच म्हटले नाही की आमचा देश पवित्र व सभ्य आहे. इतर देशाचे निवासी म्लेच्छ आणि दस्यू आहेत. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी त्यांच्या अंतिम 'हज' च्या प्रसंगी लाखों अनुयायांना उद्देशून असे म्हटले,

"खबरदार! कोणत्याही अरबवासीयास इतर देशवासीयावर आणि कोणत्याही इतर देशवासीयास अरबवासीयांवर कोणत्याही प्रकारे श्रेष्ठत्व नसून कोणत्याही गौरवर्णीयाने कृष्णवर्णीयापेक्षा व कोणत्याही कृष्णवर्णीयाने स्वत:स गौरवर्णीयापेक्षा श्रेष्ठ समजता कामा नये. श्रेष्ठत्व हे केवळ ईशपरायणता आणि सदाचारावरच आधारीत आहे."

यानंतर आपण पितांबरपीठ संस्कृत परिषदेच्या स्वामीजींचे 'वैदिक उपदेश'मधून वैदिक मंत्राचा भावानुवाद घेऊ या. तसेच श्लोक वेद संहितामधूनही प्रत्यक्ष घेऊ.

"अनुव्रत: पितु: पुत्रो मात्रा भवतु संमना:।

जाया पत्ये मधुमती वाचं वदतु शन्तिवाम्॥" (अथर्ववेद : ३-३०-२)

अर्थात - "पुत्र पित्याच्या अनुकूल चालणारा असावा, माता सुंदर मनाची असावी, पतीच्या प्रति सुखकारक आणि गोड बोलणारी पत्नी असावी."

निश्चितच माता-पिता, पुत्र, पत्नी हेच परिवाराचे मूळ आधार आहेत. म्हणून सुखी परिवारासाठी पुत्र माता-पित्यांचा आज्ञाधारक असावा, पत्नी ही पतीच्या सुख-शांतीची काळजी करणारी आणि गोड बोलून पतीस आनंद देणारी असावी.

परिवार आणि कुटुंबासंबंधी इस्लामनेसुद्धा आपसात प्रेमाने राहण्याचीच शिकवण दिली. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी पत्नीविषयी म्हटले की, "तिचा आपल्या नवऱ्याशी असा व्यवहार असावा की, पतीने तिला पाहताच त्यास आनंद व्हावा." अर्थातच पत्नीने पतीला नेहमी आनंद द्यावा. त्याच्या आवडी-निवडी जपाव्या. त्यास पसंत असलेला साजशृंगार करावा. त्यास पसंत असलेला पोषाख परिधान करावा, त्यास आवडणाऱ्या प्रेमाच्या गोष्टी कराव्या आणि त्यास पसंत नसणारी कोणतीही गोष्ट करू नये. अर्थात तिला पाहताच पतीला आनंद व्हावा, त्याने आपल्या दिवसभराचा थकवा विसरून जावा. हे प्रत्येक पत्नीचे आपल्या पतीप्रति कर्तव्य असून यास इस्लामने ईश्वराची भक्तीच ठरविले आहे. याचप्रमाणे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी पतीचे आपल्या पत्नीप्रति आणि कुटुंबाप्रति असलेले कर्तव्य केवळ एकाच वाक्यात स्पष्ट करताना म्हटले की, "जो आपल्या पत्नीशी चांगला वागतो, तो आपल्यात सर्वांत चांगला माणूस होय. आणि मी तुम्हां सर्वांपैकी जास्त चांगला व्यवहार आपल्या पत्न्यांशी करतो. अर्थात प्रेषित मुहम्मद (स.) यांनी माणूस चांगला असण्याचा आधार पत्नीशी उत्तम व्यवहार करण्यास ठरविले आहे. याचप्रमाणे पुत्रांना आदेश दिला की, "माता-पित्यांच्या चरणाखाली स्वर्ग आहे!" आईवडिलांशी कसा व्यवहार असावा, याचेदेखील एका वाक्यात स्पष्टीकरण करण्यात आलेले आहे. याबरोबर असेसुद्धा म्हटले आहे, "माता-पित्यांच्या प्रसन्नतेमध्येच ईश्वराची प्रसन्नता आहे." यावरून इस्लामने माता-पित्यांचा योग्य दर्जा स्पष्ट केला आणि माता-पिता जर नाराज असतील तर स्वर्गप्राप्ती होणे शक्य नसल्याचे स्पष्ट करून दिले.

"मा भ्राता भ्रातरं द्विक्षन्मा स्वसारमुत स्वसा।

सम्यञ्च: सव्रता भूत्वा वाचं वदत भद्रया।।" (अथर्ववेद : ३-३०-३)

अर्थात - "भावाने भावाचा द्वेश करू नये, बहिणीने बहिणीचा द्वेश करू नये, सर्वचजण आचरण करणारे, समान कर्म करणारे असावेत."

स्वामीजींनी या मंत्राची व्याख्या अडीच पानावर केली असून गुरु-शिष्यांचे संबंध, ग्रामसंबंध व देशसंबंधाद्वारे बंधु असणाऱ्यांनादेखील या मंत्राच्या अंतर्गत भाऊ ठरविले आहे आणि हे यथार्थसुद्धा आहे. यानंतर रक्ताच्या नात्याने असलेल्या बंधु-भगिणीविषयी जास्त काही सांगण्याची गरज भासत नाही. मानवी संबंधामध्ये भाऊ-बहिणीचे संबंध अत्यंत घनिष्ट असतात. एकाच मातापित्याच्या पोटी जन्मलेल्या आणि एकाच मातेचे दूध पिणाऱ्यांत स्वाभाविकत: स्नेह आणि प्रेम तर असायला हवे. एवढे असूनही त्यांच्यात द्वेष असेल तर यापेक्षा अधिक दुराचार काय असू शकेल!

"ज्यायस्वन्तश्चित्तिनो मा वि यौष्ट संरायधयन्त: सुधराश्चरन्त:।

अन्यो अन्यस्मै वल्गु वदन्त एत सध्रीचीनान व: संमनसस्कृणोमि।।"

(अथर्ववेद : ३-३०-५)

अर्थात - "हे मनुष्यांनो! तुम्ही एकदुसऱ्यांशी संपन्न होऊनही समानचित्त होऊन, समान कार्य करताना, एकाच प्रकारचे भार उचलताना एक दुसऱ्यांशी विभक्त होऊ नका. तसेच एकदुसऱ्यांप्रति मनोहर वचनांचा प्रयोग करताना एकदुसऱ्यांशी भेटावे आणि समानरुपाने एकाच स्थानावर एकत्र झालेल्या तुम्हांस मी एकच चित्त आणि मन असलेले बनवितो."

या मंत्रामध्ये ऋषींनी ऐक्य आणि समतेचा उपदेश दिला असून हे एक सर्वकालीन सत्य आहे की, ऐक्य आणि समता असल्याशिवाय कोणताही समाज सुखी होऊ शकत नाही.

"सुविज्ञानं चिकितुषे जनाय सच्चासच्च वचसी पस्पृधाते।

तयोर्यत् सत्यं यतरदृजीयस्तदित् सोमो वति हन्त्यासत्।।"

(अथर्ववेद : ८-४-१२)

अर्थात - "ज्ञानी पुरुषासाठी सुगम विज्ञान आहे. सत्य आणि असत्य वचन परस्पर विरोधी असतात. त्या दोन्हीपैकी जे अधिक योग्य असेल, त्यासच विवेकी मर्मज्ञ समजतो आणि असत्य सोडून देतो."

या ठिकाणी श्रेष्ठ ज्ञान हे मनुष्याच्या हितात असल्याचे म्हटले गेले आहे. सत्य आणि असत्य भाषणातील स्पर्धेमध्ये जे सत्य आणि योग्य असते, त्याचीच ईश्वर रक्षा करतो.

सत्य काय असते आणि सत्याची वास्तविकता काय असते? हेच की, जी वस्तु, जी घटना, जी अवस्था आणि जी गोष्ट वास्तवात जशी असेल अगदी नेमकी तशीच मान्य करणे आणि सांगणे व त्यानुसारच कर्म आणि व्यवहार करणे होय. सत्य खूप महान आहे. एवढेच नव्हे तर सत्य हे ईश्वराचेसुद्धा एक नाव आहे. सत्याचा अरबी भाषेतील पर्यायवाची शब्द 'हक' आहे. कुरआनातसुद्धा ईश्वरासाठी 'हक' हा शब्द प्रयुक्त झालेला आहे. ईश्वराचे कार्यसुद्धा 'हक' (अर्थात सत्य) असल्याचे म्हटले गेले आहे. उदाहरणार्थ, सृष्टीच्या निर्मितीविषयी म्हटले गेले आहे की, 'ईश्वराने सृष्टीची निर्मिती 'हक' बरोबर (अर्थात सत्यासह) केली आहे.' म्हणजेच अशा यथार्थ विधीने सृष्टीची सोद्देश्य निर्मिती वा रचना ईश्वराने केली आहे की, सृष्टी आणि सृष्टीतील प्रत्येक बाबीत किंचितही त्रुटी आढळणे शक्य नाही, कोणत्याही प्रकारचा दोष आढळणे शक्य नाही. सूर्य, चंद्र, ग्रह आणि ताऱ्यांना पाहिल्यास ही बाब कोणताही वैज्ञानिक आणि संशोधक तसेच अशिक्षित व अज्ञानीसुद्धा ही गोष्ट अगदी मनापासून स्वीकारतो की, सूर्य, चंद्र आणि तारे किती प्रचंड मोठे आणि किती मोठ्या परिघात भ्रमण करीत आहेत, मात्र त्यांच्यात एक मायक्रोमिली मीटरचासुद्धा फरक आणि दोष कधीही उत्पन्न होत नाही. वैयक्तिक असो अगर सामूहिक असो, मानवजीवनात सत्याला अनन्यसाधारण महत्त्व आहे. सत्य आणि सत्यवादीची प्रत्येकजण प्रशंसा आणि सन्मान करतो. त्यावर प्रत्येकजण विश्वास ठेवतो. माणसाच्या जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रामध्ये सत्याची नितांत गरज असते. यामुळेच माणूस परस्पर विश्वास करतो आणि एकमेकांशी समाधानी असतो. नसता पूर्ण मानवव्यवस्थाच कोलमडून जाईल.

सत्याची महिमा आणि गरज ही इतकी सरळ आणि स्पष्ट वास्तविकता आहे की मूर्ख आणि अशिक्षितासुद्धा याविषयी काही सांगण्याची गरज नसते. तरीसुद्धा मूर्ख आणि अज्ञानीपेक्षा अधिक विद्‌वान व बुद्धिमानच सत्य सोडून स्वार्थ साधण्यासाठी असत्याचा अवलंब करतो.

आजचा काळ असत्य घटनांच्या विळख्यात आहे. सर्वत्र असत्याचे भयानक थैमान आहे. सर्व व्यवहार असत्याने दूषित आहेत. बाजार असो, ऑफिस असो, कोणतेही ठिकाण असो, प्रत्येक ठिकाणी असत्याची सत्ता असलेली दिसते. याचे कारण धर्मच मुळात दुर्बल आणि प्रभावहीन आहे. काय विहित आहे आणि काय अविहित

आहे, कोणती बाब योग्य आहे आणि कोणती अयोग्य आहे, हे खरे पाहता धर्मच शिकवितो. मात्र आज भौतिकवादाने धर्माच्या हातून सत्ता व सामर्थ्य बळकावले आणि धर्मास आपला दास करून ठेवले आहे. यामुळे सर्वत्र असत्याचे राज्य आणि अराजकता माजलेली आहे. तरीदेखील हे विसरता कामा नये की, 'जर सत्य नसेल तर मानवतादेखील नाही'. मनुष्य कितीही ज्ञानी व विद्वान असला आणि कितीही प्रगती करून चंद्रावर जरी जाऊन आला असला तरी तो स्वार्थाच्या देवतेची पूजा करून केवळ नावापुरताच मानव उरणार. शरीराने मानव जरी दिसत असला तरी प्रवृत्तीने मात्र तो पशूच असणार. त्याच्या मानवतेची सत्यतासुद्धा असत्यच राहणार, हे निश्चित!

यानंतर आपण इस्लामधर्म आणि इतर धर्मांचे तुलनात्मक चिकित्सक माननीय मुहम्मद फारुक खान यांच्या 'वेद और कुरआन' (हिंदी) या पुस्तिकेतून 'वैदिक शिक्षाएँ' या प्रकरणातून सामग्री घेऊ या आणि चर्चा पुढे सुरु ठेवू या.

"उहदैदभि श्रुतामधं वृषभ नर्यापसम्।
अस्तारमेषि सूर्य॥" (ऋग्वेद : ८-९३-१, सामवेद : १२५)

अर्थात - "हे सकल संसारास दीप्यमान करणाऱ्या! तू निश्चितच त्या मनुष्याच्या हृदयामध्ये अलोकित होतो, जो आपले धन दीन-दुबळ्यांना देतो, जो ज्ञान आणि भक्तीरसाची वर्षा करतो, जो हितकारी परोपकारी वगैरे कार्य करतो आणि जो काम-क्रोध वगैरेसारख्या शत्रूंना पिटाळून लावतो."

या मंत्रामध्ये ऋषींनी दोन गोष्टींची शिकवण दिली.

१) ईश्वराने धन व संपत्ती दिल्यास तिचा वापर केवळ आपल्याच आमोद-प्रमोद आणि सुख-विलासाकरिता करीत नसून दीन-दुःखीची मदत करण्यासाठीही ती खर्च करतो. जे दीन-दुःखीजनांविषयी सहानुभूती ठेवीत नाहीत व त्यांची मदत करीत नाहीत, ते पाषाणहृदय ईश्वरी आलोकाने आलोकित होण्याच्या लायकीचे राहत नाहीत.

२) काम-क्रोधापासून दूर राहावे. हे दोन दुर्गुण असून अनेक दुर्गुण व दुराचारांचे मूळसुद्धा आहे. म्हणून यापासून दूर राहावे.

"नाम नाम्ना जोहवीति पुरा सूर्यात् पुरोषसः।
यदजः प्रथमं संबभूव स ह तत् स्वराज्यमियाय यस्मान्नान्यत् परमस्ति भूतम्॥"
(अथर्ववेद : १०-७-३१)

अर्थात - "जो जन्मजात सर्वश्रेष्ठ ईश्वराप्रति उष:काळापूर्वी, सूर्योदयापूर्वी आणि सूर्यास्तापूर्वी संयुक्त होत असतो आणि नमस्कार करण्यायोग्य ईश्वराच्या नामाचे जप करतो, तोच त्या स्वराज्यास, आंतरिक प्रकाशास आणि मुक्तीस प्राप्त करतो, ज्यापेक्षा जास्त इतर काहीही नाही. अन्य कोणतेही पदार्थ नाही."

सूर्योदयापूर्वी आणि सूर्यास्तापूर्वीची वेळ विचारवंतांसाठी खूप प्रभावी असते. ते या वेळी प्रत्यक्षरूपाने ईश्वराची सत्ता, शक्ती आणि प्रभुत्वाचे अवलोकन करीत असतात. दिवसभर प्रकाशाने लखलखणारा सूर्य रात्री असा लोप पावतो जणू त्याचे अस्तित्वच नाही. मात्र तोच सूर्य रात्र संपताच परत उगवतो आणि संध्याकाळी परत मावळतो. इस्लामनेसुद्धा इतर वेळेबरोबरच या वेळेमध्येसुद्धा ईशोपासनेचा विशेष नियम नमाजच्या स्वरुपात घालून दिला आहे. कुरआनात म्हटले आहे,

"आपल्या पालनकर्ता प्रभूचे प्रशंसेसह गुणगान करावे (अर्थात नमाज पढावी) सूर्योदयापूर्वी आणि सूर्यास्तानंतर!" (संदर्भ : कुरआन - ५०: ३९)

"सकाळी व संध्याकाळी आपल्या पालनकर्त्याच्या नामाचे स्मरण करा आणि रात्रीच्या काही काळातही त्याच्यासमोर 'सजदा' करा आणि त्याचे गुणगान करा दीर्घ रात्रीपर्यंत!" (संदर्भ : कुरआन - ७६ : २५,२६)

"अध : पश्यस्त मोपरि संतरां पादकौ हर।

मा ते कशप्लकौ दृशन त्स्मी हि ब्रह्मा बभूविथ।।" (ऋग्वेद : ८-३३-१९)

अर्थात - "हे नारी ! नजर खाली ठेव, वर पाहू नकोस. दोन्ही पाय नीटप्रकारे जोडून ठेव. तुझे कशप्लक, दोन्ही स्तन, पाठ आणि पोट, दोन्ही नितंब, दोन्ही जांघा, दोन्ही पोटऱ्या आणि दोन्ही पंजावरील जोड दिसता कामा नये. कारण स्त्री ही निर्माणकर्तृत्व आहे.

स्त्री ही वस्तुत: परिवाराची आधारशिला असून ही आधारशिला जर सुदृढ असेल तरच सुख आणि समाधानकारक जीवनाची इमारत उभी राहू शकते. स्त्री व पुरुषाने विवाहाद्वारे एका बंधनात बांधले जाऊन उत्तमप्रकारे जीवन व्यतित करावे.

स्त्री आणि पुरुषात एकदुसऱ्याप्रति स्वाभाविक आकर्षण आहे. म्हणूनच वेदऋषीने स्त्रीला असा आदेश दिला आहे की, तिने परपुरुषांसमोर येऊ नये. विनावश्यक घराबाहेर पडू नये. आवश्यकता असेल तरच घराबाहेर पडावे आणि तेदेखील शरीर झाकूनच बाहेर निघावे. त्यांनी असे न केल्यास अर्थात नग्न शरीर घेऊन

अगर अर्धनग्न शरीर घेऊन बाहेर पडल्यास पुरुष त्यांच्याकडे स्वभावताच आकर्षित होतील आणि त्यादेखील पुरुषांकडे आकर्षित होतील. परिणामी त्या जर विवाहित असतील तर त्यांचे विवाहित जीवन प्रभावित होईल आणि अविवाहित असतील तर वाममार्गी लागतील. समाजातील बिघाडाचे हेच मूळ आहे. येथूनच समाजात व्यभिचार आणि बलात्कारासारखे कांड होतात.

आजच्या काळात ही वैदिक शिकवण बिनधास्तपणे पायदळी तुडविण्यात येत आहे. अविवाहित (आणि विवाहितसुद्धा) तरुणी बिनधास्तपणे अर्धे शरीर उघडे-नागडे करून फिरत आहेत. स्त्रियांच्या शरीरावरील पडदा पुरुषांच्या अकलेवर जाऊन पडला आणि तेसुद्धा आधुनिकवादाच्या तंद्रीत आणि भौतिकवादाच्या मस्तीत आपल्या बायकांना शरीर उघडे करून इतरांसमोर व परपुरुषांसमोर मिरवित असतात. लाज-लज्जा आणि मर्यादेची लक्ष्मणरेषा ओलांडून आज संस्कृती व सभ्यता दारोदार ठेचाळत फिरत आहे. परिणामी देशावर व्यभिचार, बलात्कार व रक्तपाताच्या अपराधांचा अघोरी विळखा पडलेला आहे आणि मानवतेचा केविलवाना आवार्त टाहो काळीज फाडत आहे.

'गीता प्रेस, गोरखपूर' हे हिंदू धर्माच्या शिक्षणाचे एक प्रमुख आणि प्रसिद्ध केंद्र असून या ठिकाणाहून प्रकाशित होणारी हिंदू धर्माची पुस्तके प्रमाणित समजली जातात. 'श्री हनुमान प्रसाद पोद्दार' या महान विचारवंतांचे 'मानव धर्म' हे पुस्तक याच गीता प्रेस वरून प्रकाशित झाले आहे. या पुस्तकामध्ये लेखक महोदयांनी मानवधर्माची अत्यंत स्पष्ट शब्दांत व्याख्या करताना म्हटले आहे की, (याचा मराठी भावानुवाद येथे सादर करीत आहोत.)

"हिंदू धर्म अगर हिंदू समाजात प्रामुख्याने दोन व्यवस्था आढळतात. एक 'वर्ण व्यवस्था' अथवा 'वर्ण धर्म' आणि द्वितीय 'आश्रम व्यवस्था' वर्णव्यवस्थेनुसार हिंदू समाजाचे चार वर्ण अनुक्रमे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र होय. याशिवाय आश्रम व्यवस्थेनुसार मानवी जीवनाच्या चार अवस्था आहेत. पहिली अवस्था ही जन्मापासून २५ वर्षे वयापर्यंत असून ही अवस्था शिक्षण-प्रशिक्षणाची होय; दुसरी अवस्था वयाच्या २६ वर्षांपासून ५० वर्षांपर्यंत असून ही अवस्था लग्न करून गृहास्थाश्रमाची आहे; तिसरी अवस्था वयाच्या ५१ ते ७५ वर्षांपर्यंतची असून ही जंगलात राहून ईश्वरोपासनेची अगर भक्तीची आहे. तर चौथी अवस्था वयाच्या ७६ वर्षांपासून मरेपर्यंतची आहे. या अवस्थेत संन्यास घेऊन देश-विदेशात फिरून उपदेश करावा.

या दोन्ही धर्मावस्थांव्यतिरिक्त आणखीन दोन धर्मावस्था आहेत. प्रथम 'सामान्य धर्म' आणि द्वितीय 'साधन धर्म' होय. सामान्य धर्म अशा कर्मांना म्हटले जाते, जे प्रत्येक माणसाकरिता एकसमान स्वरुपात आवश्यक आहेत. मग ते कोणत्याही वर्ण अथवा आश्रमाशी संबंधित असो. याच सामान्य धर्मास 'मानव-धर्म' असेही म्हणतात.''

हिंदू धर्मात याचे महत्त्व स्पष्ट करताना लेखक महोदयांनी लिहिले आहे,

''महाभारतामध्ये आहे की, धर्म स्तां हित: पसां धर्मश्चैवा श्रम: सताम। धर्मोल्लोका स्त्रयस्तात प्रवृत्ता: सचराचरं।।

अर्थात : ''धर्मच सतपुरुषांचे हित असून धर्मच सत्पुरुषांचा आश्रय आहे. त्याचप्रमाणे चराचर तिन्हीलोक धर्मामुळेच चालतात.

हिंदू धर्मशास्त्रात धर्माचे मोठे महत्त्व असून धर्महीन लोकांना शास्त्रकारांनी पशूसमान असल्याचे म्हटले आहे. 'धर्म' या शब्दाचे उगमस्थान 'धृ' हे धातू असून याचा अर्थ धारण करणे अगर पालन करणे असा होतो. त्याचप्रमाणे जो सृष्टीतील समस्त जिवाच्या कल्याणाचे मूळ असते त्यालाच धर्म समजावे.''

यानंतर 'सामान्य धर्म' अथवा 'मानव धर्म' या बाबतीत लेखक महोदयांनी लिहिले की,

''ज्या धर्माचे पालन केवळ मनुष्यच करु शकतो त्यालाच 'सामान्य धर्म' अथवा 'मानव धर्म' असे म्हणतात.''

वर्णधर्म, आश्रय धर्म आणि साधन धर्माचा परिचय दिल्यानंतर लेखक महोदयांनी मानव धर्माविषयी लिहिले की,

''मानवाकरिता 'सामान्य धर्माचे विशेष' महत्त्व आहे. याचे सर्वचजण प्रत्येकवेळी पालन करु शकतात.''

सामान्य धर्म अथवा मानव धर्माची मानवी कर्तव्ये किती आणि कोणकोणती आहेत,

याविषयी लेखक महोदयांनी लिहिले आहे की,

''शास्त्रकारांपैकी काहींनी आठ, काहींनी दहा, काहींनी बारा, काहींनी पंधरा व सोळा आणि काहींनी यापेक्षाही जास्त सामान्य धर्माची लक्षणे स्पष्ट केली आहेत. श्रीमद भागवताच्या सातव्या अध्यायामध्ये सनातन धर्माची तीस लक्षणे स्पष्ट करण्यात आली

असून त्यांचे महत्त्व अपार आहे. विस्तारभयास्तव येथे त्यांच्या विस्तृत वर्णणास कात्री लावून केवळ मनूने दाखविलेल्या धर्माच्या दहा लक्षणांवरच थोडक्यात चर्चा करण्यात येत आहे.'' (संदर्भ : मानव धर्म, पृष्ठ -८)

यानंतर माननीय लेखक महोदयांनी मनूचे वचन उद्‌धृत केले. मात्र तळटीपांमध्ये भागवतगीतेतील श्रीकृष्णाचे वचनदेखील उद्‌धृत करून अधिक सबळ पुरावा सादर केला. म्हणून आपण काही उपयुक्त वचने येथे घेऊ या...

१) सत्य, २) दया, ३) तम, ४) शौच (पावित्र्य), ५) तितिक्षा (उचित व अनुचिताचा विचार), ६) अहिंसा, ७) त्याग, ८) स्वाध्याय, ९) संतोष, १०) व्यर्थ गोष्टींचा त्याग, ११) आत्मविचार, १२) श्रीहरीच्या नामाचे आणि गुणांचे श्रवण, कीर्तन व स्मरण करणे, १३) श्रीहरीची सेवा करणे, पूजा करणे, प्रणात करणे, १४) स्वत:स श्रीहरीचा दास समजणे आणि १५) श्रीहरीसमोर आत्मसमर्पण करणे.

(संदर्भ : मानव धर्म, पृष्ठ - ८)

माननीय लेखक महोदयांनी मनूच्या वचनाचा उल्लेख करून त्यातील एकन् एक कर्माचे स्पष्टीकरण विस्तृतपणे करण्यापूर्वी एक अत्यंत महत्त्वपूर्ण व फायदेशीर भूमिका लिहिली आहे. म्हणून या ठिकाणी प्रथम त्यांची भूमिका देत आहोत आणि नंतर लेखक महोदयांच्याच व्याख्येनुसार त्या कर्मांचा परिचय देत आहोत, ज्या कर्मांना मनूंनी 'मानवधर्म' म्हटले आहे.

## लेखक महोदयांची भूमिका

''कोणत्याही जाती आणि संप्रदायाच्या अनुयायांना कोणतीही अडचण नसलेले हे धर्म आहेत. खरी गोष्ट अशी की, हेच मानवजातीचे स्वाभाविक (अगर निसर्गदत्त) धर्म असून मनुष्याच्या मानवतेचा विकास याच धर्माच्या आचरणामुळे होणे शक्य आहे. जेव्हा माणूस आपल्या वास्तविक स्वभावाविरुद्ध या धर्मांचे पालन करणे सोडून देतो, तेव्हापासूनच त्याची अधोगती आणि ऱ्हास सुरु होतो. जेव्हा लोक या धर्मांचे पालन करीत असत, तेव्हा जगात सुख आणि शांतीचे नंदनवन होते. मात्र जसजसे लोक या धर्मांचे पालन करणे सोडून देऊ लागले, तसतसे त्यांच्यात दु:ख आणि अशांतीची काटेरी झुडुपे उगू लागली आणि आज समस्त जगातील मानवांनी याच धर्मांचा प्राय: त्याग केल्याने आपापल्या क्षुद्र स्वार्थासाठी परस्पर वैरभाव आणि तिरस्कारांच्या उग्र ज्वाला पेटवून. एकमेकांना गिळंकृत करीत आहेत. हेच कारण आहे की आज स्वत:स

बुद्धिमान समजणाऱ्या लोकांच्या वस्त्यांमध्ये कोठेच सुख-शांती आढळत नाही. जिकडे पाहावे तिकडे जगाच्या पाठीवरील सर्वच देशांतील लोक दुःखाच्या दाहक ज्वालांमध्ये अक्षरशः होरपळत आहेत. केवळ गरीबच नव्हे तर गर्भश्रीमंतसुद्धा अशांतीच्या आगीत भस्म होत आहेत. केवळ दरिद्री, दलित आणि निर्धनच नव्हे तर भव्य, विशाल आणि प्रशस्त महालात राहणारे, मोटार आणि विमानांत स्वच्छंद फिरणारे, मोठमोठे उद्योजक, व्यावसायिक आणि इशारा करताच सर्व प्रकारच्या सुखवस्तु प्राप्त करणारे, अत्यंत उच्च अधिकारपदांवर प्रतिष्ठित होऊन जनतेवर कुरघोडी करणारे, विज्ञान आणि संशोधनाच्या जोरावर समस्त जगाला तोंडात बोट घालायला लावणारे, युद्धसामुग्रीच्या जोरावर इतर देश आणि जातींना गुलाम करणारे, आपल्या साहित्य आणि कवन सामर्थ्याने तसेच कलाकौशल्याने साऱ्या जगाला मंत्रमुग्ध करणारे, धर्मोपदेशकांच्या सिंहासनावर बसून स्वर्गाचा सरळ मार्ग दाखविणारे, त्यांची प्रवचने डोळे बंद करून, माना डोलावून ऐकणारे, संपादकाच्या खुर्चीवर बसून अख्या जगाचे समालोचन करणारे; मोठमोठ्या जनसभांमध्ये घसा बसेपर्यंत ओरडून शब्दांचे फटाके फोडणारे, मोठमोठ्या राष्ट्रीय पक्षांच्या अध्यक्षस्थानी असणारे; मंत्रीपदांवर विराजमान असलेले; एम.बी.ए.,एम.डी. आणि इंजीनियरींग करून प्रचंड पगार उचलणारे; विचार आणि ज्ञानाची उधळण करणारे विचारवंत आणि अशा समस्त प्रकारच्या लोकांच्या हृदयांत व अंतःकरणात जरा डोकावून पाहा, या सर्वांचीच हृदये आणि अंतःकरणे दुःख आणि अशांतीच्या दाहक ज्वालांत होरपळताना आणि अश्रू ढाळताना दिसतील. एवढेच नव्हे तर जरा स्वतःच्या छातीवर हात ठेवून पाहा, आतमध्ये जळणाऱ्या अंतःकरणाचे चटके नाही लागले तरच नवल! जरा हासऱ्या आणि देखण्या चेहऱ्यांच्या आतील अवस्था डोकावून पाहा, आतील ज्वालामुखीची तीव्र जाणीव झाल्याशिवाय राहणार नाही!

या अग्नीडोंबाच्या मुळाचा जर आपण विचार केला तर हेच लक्षात येते की, लोकांनी परमात्म्यास विसरून, त्यास फारकत देऊन आणि त्याच्या प्रसन्नतेखातर भूत सामान्य मानव धर्माचा कमी-अधिक प्रमाणात तिरस्कार करून, तसेच मानवी स्वभावाच्या सर्वथा विपरित पशु-धर्माचे (अगर भौतिकवादाचे) आचरण करण्यास सुरुवात केली.'' (संदर्भ : मानव धर्म - पृष्ठ ८ ते १०)

यानंतर लेखक महोदयांनी मानवधर्माची दहा कर्तव्ये अशा प्रकारे स्पष्ट केलीत...

# मानव-धर्माची दहा कर्तव्ये

(हनुमान प्रसाद पोद्दार)

**१) धृति :**

धृतिचा अर्थ धैर्य, धारणा, संतोष अथवा सहनशीलता होय. 'भर्तृहरिनीतिश'मध्ये या शब्दाचा वापर उपरोक्त अर्थानेच करण्यात आला तो याप्रमाणे.. ''बुद्धिमान लोक निंदा करो की स्तुती, लक्ष्मी आली काय आणि तिच्या मर्जीने गेली काय, मृत्यू आजच आला काय आणि युगान्तरात आला काय, धैर्यवान लोक मात्र न्यायाच्या मार्गावरून कधीही विचलित होत नसतात.'' (पृष्ठ - १२)

**२) क्षमा :**

''आपल्यावर अपकार करणाऱ्यावर बदला घेण्याची पूर्ण शक्ती आणि सामर्थ्य असतानासुद्धा बदला न घेता त्याच्या अपकारास सहन करणे हेच 'क्षमा' होय.''

(पृष्ठ - १५)

**३) दम :**

'दम' या शब्दाचा अर्थ सामान्यत: 'इंद्रीयदमन' समजला जातो. मात्र या श्लोकामध्ये मनूने 'इंद्रीय-निग्रह' वेगळे लिहिले, म्हणून येथे 'दम'चा अर्थ 'मन-निग्रह' करणे होय. (पृष्ठ - २८)

**४) अस्तेय :**

चोरी न करण्यास 'अस्तेय' असे म्हणतात. इतरांचे अधिकार ग्रहण करणे म्हणजेच चोरी करणे होय. चोरीचे बरेच प्रकार आहेत. उदाहरणार्थ, एखाद्याची वस्तु उचलणे, वाणीद्वारे लपविणे, बोलून चोरी करविणे, चोरीच्या उद्देशाने परक्या वस्तुला पाहणे, वगैरे चोरीचे प्रकार होय.

मात्र या ठिकाणी या साधारण प्रकारची चोरी अभिप्रेत नसून मनुच्या या उदाहरणातील हा शब्द विस्तृत अर्थाने प्रयुक्त झालेला आहे. धनप्राप्तीच्या समस्त अनुचित व अवैध पद्धतींना या ठिकाणी चोरीमध्येच सामील करण्यात आलेले आहे. अर्थातच मनूच्या नियमांनुसार ''धनप्राप्तीची प्रत्येक अनुचित, अयोग्य पद्धत जी आज अख्या जगात चालू आहे, चोरीच करणे होय. अशा प्रकारची चोरी गरीब व दरिद्री नव्हे तर मोठमोठे भांडवलदार, शेठ-सावकार, व्यावसायिक-उद्योजक, राजकारणी नेते,

मंत्री-संत्री, उच्चाधिकारी, शासकवर्ग आणि प्रबंधकसुद्धा करीत आहेत. स्वत: भारतातदेखील याच प्रकारच्या पांढरपेशातील चोऱ्या-दरोड्याचा इतका जोर वाढला की, कायदासुद्धा हतबल झालेला आहे. पूर्वीच्या काळात काही विशेष लोकच चोरी करीत असून समाजात त्यांना अपमान आणि तिरस्काराच्या दृष्टीने पाहिले जात असे. मात्र आज चोरीचे असंख्य रुप आणि फॅशन चलनात आले असून हे एक प्रतिष्ठेचे लक्षण व एक सभ्य व्यापार ठरत आहे. त्याचप्रमाणे अशा प्रकारच्या (पांढरपेशा) चोरांचा आज समाजात सर्वच मान-सन्मान होत आहे.'' (पृष्ठ - ३१,३२)

**५) शौच :**

शुद्धी आणि पावित्र्यास शौच असे म्हटले गेले आहे. शारीरिक आणि आत्मिक या दोन्ही प्रकारची शुद्धी यात अभिप्रेत आहे.

**६) इंद्रिय निग्रह :**

इंद्रियांना (कान, डोळे, नाक, रसना वगैरे) कोणत्याही वाईट विषय आणि कर्मांकडे जाण्यापासून रोखणे आणि कायमस्वरुपी त्यांच्यावर ताबा मिळवून कल्याणकारी कार्यासाठी त्यांचा वापर करणे म्हणजे 'इंद्रिय-निग्रह' होय. मनू महाराजांनी म्हटले आहे की, ''इंद्रियांना, विषयात रमविल्याने निश्चितच मानवात दोष निर्माण होतो. मात्र जर याच इंद्रियांवर ताबा मिळविला तर त्यास परमसिद्धी प्राप्त होऊ शकते.'' (पृष्ठ - ६२)

**७) धी :**

मानव धर्माचे सातवे लक्षण 'श्रेष्ठ बुद्धी' असून मनुष्यामध्ये बुद्धी हीच एक अशी अद्‌भूत वस्तु आहे, जिच्यावर मानवाचे पतन आणि उत्थान अवलंबून आहे. श्रीकृष्णाने गीतेत म्हटले आहे की, ''ज्या बुद्धीच्या माध्यमाने मनुष्य धर्म-अधर्म, कर्तव्य-अकर्तव्यास यथार्थ समजत नाही, ती बुद्धी 'राजसी' आणि जी बुद्धी तमोगुणांनी झाकलेली अधर्मास धर्म समजते आणि इतर बऱ्याच समस्त अर्थांना त्यांच्या विपरित समजते, ती बुद्धी 'तामसी' होय.''

मनूजींनी 'धी' शब्दामध्ये उपरोक्त दोन्ही बुद्धींना अभिप्रेत न घेता त्या सात्विकी आणि श्रेष्ठ बुद्धीला अभिप्रेत घेतले, जी सत्संग, शास्त्रांचे अनुशीलन भगवद्‌भजन आणि आत्मविचाराने प्राप्त होते, ज्यामुळे परमकल्याणस्वरुप परमात्म्याची प्राप्ती होते. (पृष्ठ - ६७)

## ८) विद्या :

या ठिकाणी आध्यात्मिक विद्येसाठी विद्या हा शब्द वापरण्यात आला आहे. 'अध्यात्मविद्या विद्यानाम' हेच श्रीकृष्णाने आपले स्वरुप दाखविले आहे. (संदर्भ : गीता - १०-३२) आणि याच (आध्यात्मिक) विद्येमुळे परमात्म्याची प्राप्ती होत असते. आजकाल आपण 'विद्या' या शब्दाचा अर्थ घेतो आणि जिच्या विस्ताराकरिता अख्या जगभरात विद्यालयांचा आणि मोठमोठ्या विद्यापीठांचा घोडेबाजार भरलेला आहे, ती तर अधिकांश अविद्या असून भोगपरायणतेस खत-पाणी घालीत आहे. ही विद्या परमात्म्याची प्राप्ती करून देत नसून या इहलोकी जीवनातील भौतिक सुखालाच परमसुख मानण्याची शिकवण देते, जी मिथ्या अभिमान आणि व्यर्थ अहंकार उत्पन्न करून परमार्थ साधनात मदत करणाऱ्या संस्कृतीचा विनाश करते आणि ईश्वराच्या अस्तित्वाप्रति अविश्वास निर्माण करते. अशा विद्येपासून तर दोन पावले दूर राहणेच श्रेयस्कर ठरते. खऱ्या अर्थाने विद्या ही धर्म आणि सदाचारामध्ये श्रद्धा व विश्वास निर्माण करते, जी समस्त विश्वात परमात्माच्या स्वरुपाचे दर्शन घडवून निस्पृह करते. जी समस्त अनेकतांमध्ये एकत्वाचे वास्तविक स्वरुप दाखवून प्राणाला सदासाठी परमसुखाच्या स्थानावर विराजमान करते. आपणही याच 'ब्रह्म-विद्येचा' आश्रय घ्यायला हवे!''

(पृष्ठ - ६९)

## ९) सत्य :

विश्वातील विभिन्न धर्म-संप्रदायांत ना-ना प्रकारचे मतभेद असूनदेखील या विषयावर मात्र सर्वांचीच सहमती आहे. सर्व शास्त्रांनी एकाच स्वरात सत्याचा महिमा गायला आहे. 'सत्य ज्ञान मनन्तं ब्रहमं' या श्रुतीमध्ये सत्य हेच ब्रह्माचे स्वरुप असल्याचे स्पष्ट करण्यात आले आहे.

(पृष्ठ - ६९)

## १०) अक्रोध :

मनाविरुद्ध एखादी गोष्ट घडल्यास जी एक ज्वालामयी वृत्ती निर्माण होते, तिला क्रोध असे म्हणातत. क्रोध निर्माण होताच माणसाची बुद्धी भ्रष्ट होते. कर्तव्य-अकर्तव्य आणि उचित-अनुचिताचे ज्ञान लुप्त होऊन (क्रोधाच्या आहारी जाऊन) नको ते घडते. श्रीकृष्णाने गीतेत म्हटले आहे की, ''काम, क्रोध आणि लोभ ही आत्म्याचे पतन करणारी नरकाची तीन दारे आहेत. म्हणून या तिन्हींचा त्याग करणे आवश्यक आहे.''

(पृष्ठ - ८५)

शेवटी निम्नलिखित प्रार्थनेवर आपण या अध्यायाची सांगता करु या.

"त्वद्योहि चेखे विदा भगं वसुत्तये।

उद्वावृषस्व मधवन गविष्ट्य उदिन्द्राश्वामिष्ट्ये॥"

(सामवेद अ : ३, खं : १, मं : ८)

अर्थात - "हे उत्तम धनाच्या स्वामी! ऐश्वर्यधन इच्छिणाऱ्यांना देऊन टाका. गायी-गायीची कामना, इच्छा करणाऱ्यावर वर्षाव कर. थोडे-थोडे मागणाऱ्यास देऊन टाक. मात्र हे परमात्मा! आपल्या उपासकासाठी स्वत: तूच ये!"

ही किती प्रभावी आणि हृदयास पाझर फोडणारी तसेच भक्तीभावाने ओतप्रोत भरलेली प्रार्थना आहे! भक्तांना तर फक्त ईश्वरच हवा असतो. ऐहिक धन, ऐश्वर्य, शासन आणि इतर सर्वकाही ईश्वराच्याच अधिकारामध्ये असून अविनाशी व अनश्वर तर केवळ एक ईश्वरच आहे. म्हणून त्याचे भक्त केवळ त्याच्याच प्राप्तीची कामना करतात. ज्याला समस्त विश्वाचा स्वामी मिळाला, त्याला सर्वकाही प्राप्त झाले. बादशाह मेहमूद आणि त्याचा गुलाम अयाजच्या स्वामीप्रेमाची कथा खूप प्रसिद्ध आहे. बादशाह मेहमूद आपल्या दरबारी आणि पदाधिकाऱ्यांपैकी अयाजच्या स्वामी-प्रेमावर अतिशय खूश होता. हीच गोष्ट दरबारी आणि पदाधिकाऱ्यांना बोचत होती. त्यांच्या मनात अयाजविषयी सवतमत्सर निर्माण झाला होता. बादशाह मेहमूदने याचे निवारण करण्यासाठी एक जबरदस्त शक्कल लढविली. त्याने आपल्या दरबारात सोने चांदी आणि जड-जवाहिरांचे ढीग लावले आणि दरबारी व पदाधिकाऱ्यांना सांगितले की, ज्यांना जे पाहिजे आणि जेवढे पाहिजे लुटून घेऊन जावे. बादशाह मेहमूदची आज्ञा मिळताच सगळे दरबारी आणि पदाधिकारी त्या संपत्तीच्या ढिगारांवर तुटून पडले. मात्र स्वामीनिष्ठ अयाजने बादशाह मेहमूदच्याच डोक्यावर हात ठेवले आणि चुपचाप उभा राहिला. बादशाह मेहमूदने अयाजला विचारले की, "सर्वांनीच संपत्ती लुटून घेतली. तू मात्र काहीही घेतले नाही का बरे?" यावर अयाज शांतपणे उत्तरला, "हे स्वामी! सर्वांनीच आपापल्या आवडीच्या वस्तु लुटून नेल्या आणि मीसुद्धा आपल्या आवडीची वस्तु लुटली आणि माझी आवडती वस्तु आपणच आहात!" अयाजच्या या उत्तराने सर्वच लुटारू आवाक झाले आणि सर्वांच्या लक्षात आले की बादशाह मेहमूद आपल्यांपैकी सर्वांत जास्त अयाजचाच का लाड करतो!

## प्रकरण तिसरे

# इस्लामची मानवतावादी शिकवण

इस्लामची मानवतेसंबंधी शिकवण सादर करण्यापूर्वी ही बाब स्पष्ट करणे नितांत गरजेचे आहे की, इस्लाम हे मानव-जीवनाचे एक परिपूर्ण विधान आहे. त्याचप्रमाणे आपण 'मानवतेचा राजमार्ग' या पहिल्याच प्रकरणामध्ये ज्या तीन आधारभूत धारणांकडे अंगुलीनिर्देश केले, ते इस्लामी जीवनाचे केंद्र अगर ध्रुव असून याच ध्रुवांभोवती पूर्ण इस्लामी शिकवण भ्रमण करते आणि क्रमशः मानवजीवनाच्या एका संपूर्ण विधानाचे आणि व्यवस्थेचे स्वरुप धारण करते. इस्लाममध्ये जीवनाची अनेक विधाने नसून केवळ एकच विधान आहे. त्याचप्रमाणे इस्लामने मुस्लिमांचे वेगवेगळे वर्ग आणि वर्णसुद्धा ठरविलेले नसून केवळ एकच मानवसमुदाय निर्माण केला आहे. जग निर्मितीपासून जग नष्ट होईपर्यंतच्या आणि भूतलावरील प्रत्येक ठिकाणच्या समस्त मुस्लिमांसाठी केवळ एकच विधान एकमेव ईश्वराने प्रदान केले आहे.

या स्पष्टीकरणाचा एवढाच एक हेतु आहे की, मानवता जर स्थापन करायची असेल तर जीवनाच्या प्रत्येक विभाग, प्रत्येक क्षेत्र आणि प्रत्येक पैलू व प्रत्येक क्षणात इस्लामी जीवन-विधानानुसार आचरण करणे आवश्यक असून ही बाब पूर्णतः बुद्धीसंमत व तर्कसंगत आहे. हे तथ्य समजून घ्यावे की समजा एका विशेष रुपाची सुंदर मानवी काया अगर मूर्ती तयार करण्याचा एक साचा आहे. यात धातू वितळवून टाकण्यात येते आणि साचा उघडताच आपल्याला एक सुंदर मानवाची मूर्ती मिळते. याबरोबरच हेसुद्धा एक स्पष्ट तथ्य आहे की, आपल्याला हवी असलेली ती मानवी प्रतिमा केवळ अशा अवस्थेतच प्राप्त होऊ शकते, अथवा तयार होऊ शकते, जेव्हा ती पूर्ण स्वरुपात त्या साच्यात ढाळण्यात आलेली असेल. याउलट जर तिचा काही भाग एका साच्यात ढाळून इतर काही भाग जर दुसऱ्याच साच्यात ढाळले तर या प्रतिमेतून हवी ती मूर्ती वा प्रतिमा आपल्याला मिळू शकणार नाही. त्याच साच्याचे लेबल लावूनसुद्धा या प्रतिमेत साच्यातील गुण व्यक्त होणे शक्य नाही. हीच गोष्ट आजच्या मुस्लिम समाजावर लागू करून पाहावी. ते इस्लामी लेबलच्या कंपनीचे असूनसुद्धा पूर्णतः इस्लामच्या साच्यात ढळलेले अगर तयार झालेले नाहीत.

या आवश्यक स्पष्टीकरणानंतर आता आपण इस्लामच्या त्या शिकवणी सादर करीत आहोत, ज्यांना हिंदू धर्मात 'मानव धर्म' म्हटले गेले आहे. त्याचप्रमाणे या शिकवणीवर समस्त मानवजातीला सर्व प्रकारचे धार्मिक, वांशिक, प्रादेशिक आणि

इतर सर्वच प्रकारच्या भेदभावांना कायमची मूठमाती देऊन आचरण करणे व या शिकवणींचा लाभ उचलून आपले जीवन यशस्वी करणे शक्य आहे. या ठिकाणी आम्ही 'मानव धर्म'च्या लेखक महोदयाप्रमाणे केवळ मनुंच्या धर्माविषयीच इस्लामी शिकवणी सादर करून समाधान मानणार नसून श्रीकृष्णाने श्रीमद्भागवत गीतेमध्ये मानव धर्माच्या आणि कर्मांच्या ज्या शिकवणी प्रस्तुत केल्या आहेत, त्यासंबंधीसुद्धा इस्लामी शिकवणी सादर करणार आहोत, जेणेकरून या पुस्तकाच्या माध्यमाने हिंदू-मुस्लिम या दोन्ही समाजांच्या लोकांनी पूर्ण संतुष्टी आणि उदार मनाने खांद्याला खांदा लावून देशामध्ये मानवतेची स्थापना करावी आणि तिला पुन्हा नवीन जीवन प्रदान करावे.

इस्लामी शिकवणीची दोनच उगमस्थाने आहेत, एक ईश्वरी ग्रंथ कुरआन आणि याच ईश्वरी ग्रंथावर प्रेषित मुहम्मद (स.) यांनी प्रत्यक्ष आचरण करून दाखविलेली सांगितलेली वचने म्हणजेच 'हदीस' होय. प्रत्यक्षात ही उगमस्थाने दोन नसून केवळ एकच आहे. कारण प्रेषित मुहम्मद (स.) यांची वचने अथवा हदीस मुळात कुरआनच्या आदेशांचे स्पष्टीकरण व प्रत्यक्षात कृती आहे. म्हणून आपण प्रथम कुरआनातील असंख्य शिकवणीपैकी काही शिकवणी येथे पाहू या.

# कुरआनच्या शिकवणी

## १) न्यायाची शिकवण

"हे श्रद्धावंतांनो! अल्लाहसाठी सत्यावर अढळ राहणारे व न्यायाची ग्वाही देणारे बना. एखाद्या गटाच्या शत्रुत्वाने तुम्हाला इतके प्रक्षोभित करू नये की तुम्ही न्यायापासून विमुख व्हाल. न्याय करा, हे ईशपरायणतेशी अधिक निकटवर्ती आहे. अल्लाहचे भय बाळगून कार्य करीत राहा. जे काही तुम्ही करता अल्लाह त्याची पुरेपूर खबर राखाणारा आहे." (कुरआन - ५ : ८)

"अल्लाह न्याय, भलाई आणि नातेवाईकांचे हक्क अदा करण्याची आज्ञा देतो. आणि दुष्कर्म व स्वैराचार आणि अन्याय व अत्याचाराची मनाई करतो."

(कुरआन - १६ : ९०)

## २) प्रतिज्ञापालनाची शिकवण

"अल्लाहचे करारा पूर्ण करा, जेव्हा तुम्ही त्याच्याशी एखादा करार केलेला असेल आणि आपल्या शपथा पक्क्या केल्यानंतर मोडून टाकू नका, ज्याअर्थी तुम्ही अल्लाहला आपल्यावर साक्षीदार केले आहे." (कुरआन - १६ : ९१)

### ३) धैर्य आणि संयमाची शिकवण

"जर तुम्हा लोकांना तुमच्यावर झालेल्या अत्याचाराचा बदला घ्यायचा असेल तर फक्त त्या प्रमाणातच घ्यावा जितका तुमच्यावर अत्याचार केला गेला असेल. परंतु जर तुम्ही संयम बाळगला तर निश्चितपणे संयम बाळगणाऱ्यांसाठी उत्तम आहे."

(कुरआन - १६:१२६,१२७)

### ४) क्षमादानाची शिकवण

ज्यांना स्वर्ग प्रदान करण्यात येणार आहे, अशा लोकांची वैशिष्ट्ये स्पष्ट करताना कुरआनात म्हटले आहे,

"त्या मार्गावर धावत चला जो तुमच्या पालनकर्त्याची क्षमा व त्याच्या स्वर्गाकडे जातो ज्याचा विस्तार पृथ्वी व आकाशासमान आहे, आणि तो त्या ईशपरायण लोकांसाठी तयार केला गेला आहे, जे कोणत्याही स्थितीत आपली संपत्ती खर्च करतात, मग ते बिकट स्थितीत असोत अथवा चांगल्या स्थितीत. जे राग गिळून टाकतात व दुसऱ्याचे अपराध माफ करतात असे सदाचारी लोक अल्लाहला अतिशय प्रिय आहेत आणि ज्यांची स्थिती अशी आहे की जर त्यांच्याकडून एखादे अश्लील कृत्य घडल्यास किंवा एखादा गुन्हा करून त्यांनी स्वत:वर अत्याचार केल्यास त्यांना लगेच अल्लाहचे स्मरण होते आणि ते त्याच्याकडे आपल्या अपराधांची क्षमा-याचना करतात कारण अल्लाहशिवाय इतर कोण आहे जो अपराध माफ करू शकतो - आणि ते समजून-उमजून आपल्या कर्मावर अडून बसत नाहीत. अशा लोकांचा मोबदला त्यांच्या पालनकर्त्याजवळ असा आहे की तो त्यांना माफ करील व अशा नंदनवनात त्यांना दाखल करील ज्यांच्याखाली कालवे वाहत असतील आणि तेथे ते सदैव राहतील."

(कुरआन - ३:१३४)

### ५) प्रमाणबद्ध व योग्य मोजमापाची शिकवण

ग्राहकास विकण्यात येणाऱ्या वस्तु योग्य आणि प्रमाणबद्ध मोजमाप करूनच द्याव्यात. मोजमापामध्ये कोणत्याही प्रकारची कमतरता व त्रुटी असता कामा नये. इस्लामने मोजमाप कमी करण्यास घोर आणि शिक्षापात्र गुन्हा ठरविला आहे. कुरआनात स्पष्टपणे मापात पाप करण्यास अत्याचार करणे म्हटले गेले आहे.

"मोजमाप करण्यात अत्याचार करु नका. आणि न्यायोचितरित्या (वस्तु प्रमाणशीर आणि योग्यरितीने) मोजा तसेच मापपेक्षा कमी प्रमाणात देऊ नका."

(कुरआन - ५५:७)

ईश्वराचे प्रेषित माननीय शुऐब (अ.) यांच्या काळात मोजमापात चोरी करण्याचे दुष्कर्म लोक करीत असत. आणि आजच्या काळातसुद्धा हा गुन्हा लोक सर्रासपणे करतात. दहा किलो तांदूळ बाजारातून खरेदी करून आणल्यावर घरी मोजून पाहिल्यास नऊ ते साडेनऊ किलोच भरते. एखादी कंपनी एखादे ब्रँडेड उत्पादन बाजारात लाँच करते. उत्पादनाच्या पॅकिंग कव्हरवर उत्पादनातील ना-ना प्रकारच्या पदार्थांचे कंटेन्ट जाहीर करते, मात्र रासायनीक प्रक्रिया करून पाहिल्यास त्यातील बऱ्यांच पदार्थांचा त्यात अंशसुद्धा नसतो. कुरआनने प्रेषित शुऐब (अ.) यांचा उपदेश अशा शब्दांत मांडला आहे,

"आणि मदयनवाल्याकडे आम्ही त्यांचा भाऊ शुऐब (अ.) याला पाठविले. त्याने सांगितले, "हे माझ्या देशबंधुंनो, अल्लाहची भक्ती करा, त्याच्याशिवाय तुमचा कोणीही ईश्वर नाही. आणि वजनमापात कमी देत जाऊ नका. आज मी तुम्हाला चांगल्या स्थितीत पाहत आहे, परंतु मला भय आहे की उद्या तुमच्यावर असा दिवस येईल ज्याचा प्रकोप सर्वांना वेढून टाकील. आणि हे देशबंधुंनो, ठीक ठीक न्यायानिशी पूर्णपणे मोजमाप व वजन करा आणि लोकांना त्यांच्या वस्तूंमध्ये घट देऊ नका आणि भूतलावर उपद्रव माजवत फिरू नका. अल्लाहने दिलेली बचत तुमच्यासाठी उत्तम आहे जर तुम्ही श्रद्धावंत असाल आणि कोणत्याही परिस्थितीत मी काही तुमच्यावर निरीक्षक नाही." (कुरआन - ११ : ८४ ते ८६)

एके ठिकाणी मोजमापात कमी करणाऱ्यांचा कुपरिणाम स्पष्ट करताना कुरआनात असेदेखील म्हटले गेले की, मोजमाप आणि घेवाण-देवाणीत भ्रष्टकर्म करण्याचे कारण असे आहे की, मृत्यूपश्चात ईश्वरासमक्ष आपल्या कर्मांचा जाब देण्यावर विश्वासच नाही. मग ज्यांचा विश्वासच नसेल, तो मात्र मुस्लिम असूच शकत नाही. कारण ते मोजमापात गडबड करून धन गोळा एवढ्यासाठीच करताहेत की ते हेच ऐहिक जीवन सर्वकाही असल्याचे समजतात. ही बाब जर लक्षात घेतली की मोजमापात गडबड करणारी व्यक्ती मुळात मुस्लिम असू शकत नाही तर कोणीही हा घोर अपराध करण्यासाठी धजावणार नाही. कुरआनचे शब्द अशा स्वरुपाचे आहेत,

"विनाश आहे मोजमापात कमी करणाऱ्यांसाठी जे लोकांकडून वस्तु घेताना पूर्णस्वरुपात मोजून घेतात आणि जेव्हा लोकांना वस्तु देतात तेव्हा मूळ मापापेक्षा कमी देतात. मग हे लोक याचा विचार करीत नाही काय की (मृत्यूनंतर परत) जीवित करून उठविण्यात येईल (आणि ईश्वरासमक्ष जाब देण्यासाठी उभे राहावे लागेल)? (कुरआन - ८३ : १-४)

## ६) उपहास करण्याची मनाई

इतरांना आपल्यापेक्षा कमी समजणे, त्यांचा उपहास करणे, टर उडविणे, त्यांचा अहं दुखावण्याचा प्रयत्न करणे, हासुद्धा इस्लामने गुन्हा ठरविला आहे. कुरआनात म्हटले आहे,

"हे मुस्लिमांनो! कोणत्याही (पुरुषांच्या) गटाने इतर (पुरुष) गटाचा उपहास करता कामा नये. (कारण) तो गट उपहास करणाऱ्यापेक्षा चांगला असण्याची शक्यता आहे. तसेच कोणत्याही (महिला) गटाने इतर (महिला) गटाचा उपहास करता कामा नये. (कारण) तो गट उपहास करणाऱ्या गटापेक्षा चांगला असण्याची शक्यता आहे."

(कुरआन - ४९ : ११)

## ७) परनिंदा करण्याची मनाई

इतरांची निंदा करणे अथवा इतरांविषयी हकनाक गैरसमज करून घेणे, इतरांविषयी विनाकारण संशय बाळगणे हे समाजाकरिता अत्यंत घातक बाब असून इस्लामने यास घोर पाप ठरविले आहे. कुरआनात स्पष्टपणे म्हटले आहे,

"(कोणाच्याही बाबतीत) अत्याधिक समज घेऊ नका. कारण बऱ्याच (गैर) समजुती पापकर्म असतात. त्याचप्रमाणे एकदुसऱ्यांच्या गुपितांचा मागोवा घेण्याचा प्रयत्न करू नका आणि कोणाच्याही पाठीमागे त्याची निंदा करू नका. तुमच्यापैकी कोणीही ही गोष्ट पसंत करील काय की तुम्ही आपल्या मृत बांधवाचे मांस तोडून खावे? (निश्चितच) तुम्हास या गोष्टीची घृणा येईल. (म्हणून परनिंदा करू नका.) आणि ईश्वराचे भय बाळगा."

(कुरआन - ४९ : १२)

## ८) कुरआनची एक सर्वांगीण शिकवण

कुरआनात एक व्यापक आणि सर्वांगीण शिकवण अशा शब्दांत देण्यात आली आहे,

"भरून द्या आणि वजन कराल तेव्हा ठीक तराजूने वजन करा ही चांगली पद्धत आहे आणि परिणामाच्या दृष्टीनेदेखील हीच उत्तम आहे. एखाद्या अशा गोष्टीमागे लागू नका जिचे तुम्हाला ज्ञान नसेल. निश्चितच डोळे, कान व हृदय या सर्वांच्याकडे जाब विचारला जाईल. पृथ्वीवर घमेंडीत चालू नका, तुम्ही पृथ्वीला फाडूही शकत नाही किंवा पर्वताच्या उंचीला गाठू शकत नाही.

या गोष्टींपैकी प्रत्येकाचा वाईट पैलू तुझ्या पालनकर्त्याजवळ अप्रिय आहे. या त्या विवेकाच्या गोष्टी आहेत ज्यांना तुझ्या पालनकर्त्याने तुझ्यावर दिव्यप्रकटन केले आहे."

(कुरआन - १७ : २३ ते ३८)

## ९) सर्वांशीच चांगला व्यवहार करण्याची शिकवण

"आणि तुम्ही सर्वजण अल्लाहची भक्ती करा, त्याच्यासमवेत कोणाला भागीदार बनवू नका, आई-वडिलांशी नेक वर्तणूक ठेवा, नातेवाईक आणि अनाथ व गोरगरीबांशी चांगला व्यवहार करा आणि आप्तशेजारी, अनोळखी शेजारी, तोंडओळख असणारा साथीदार व वाटसरू आणि त्या दासी व दास जे तुमच्या ताब्यात असतील, त्यांच्याशी उपकाराचे व्यवहार करा, विश्वास ठेवा की अल्लाह एखाद्या अशा व्यक्तीला पसंत करत नाही जी आपल्या अहंभावात गर्विष्ठ असते व आपल्या मोठेपणावर अभिमान करीत असते. आणि असे लोकदेखील अल्लाहला पसंत नाहीत जे कंजूषपणा करतात आणि दुसऱ्यांनासुद्धा कंजूषपणाचा आदेश देतात व जे काही अल्लाहने आपल्या कृपेने त्यांना दिले आहे त्यास ते लपवितात. अशा कृतघ्न अश्रद्धावंत लोकांकरिता आम्ही नामुष्की आणणारी शिक्षा तयार ठेवली आहे." (कुरआन-४ : ३६)

## १०) मुस्लिमांची वैशिष्ट्ये

मुस्लिम होण्यासाठी आवश्यक असलेल्या गुणांचा कुरआनात बऱ्याच ठिकाणी उल्लेख करण्यात आला असून आम्ही कुरआनातील मजकूर येथे देत आहोत.

१) "निश्चितच यश प्राप्त केले आहे श्रद्धावंतांनी, जे आपल्या नमाजमध्ये नम्रता अंगिकारतात, व्यर्थ गोष्टीपासून दूर राहतात, जकातच्या पद्धतीची अंमलबजावणी करतात, आपल्या गुप्तांगांचे रक्षण करतात. आपल्या पत्नी व त्या स्त्रियांखेरीज ज्या त्यांच्या अधिकृत मालकीत आहेत ज्यांच्यापासून (सुरक्षित न ठेवण्यात) ते निंदनीय नाहीत, परंतु जे त्याखेरीज अन्य काही इच्छित असतील तर तेच आगळीक करणारे आहेत. आपल्या अमानती आणि आपल्या वचनांचा व करारांचा मान राखतात. आणि आपल्या नमाजचे रक्षण करतात. हेच लोक ते वारस आहेत जे वारशात नंदनवन प्राप्त करतील आणि त्यात सदैव राहतील." (कुरआन - २३ : १ ते ११)

२) "ज्यांच्या संपत्तीमध्ये वाटा निश्चित आहे मागणाऱ्यांचा आणि न मागणाऱ्यांचा म्हणून आपल्या कमाईचा एक भाग निर्धन-गरीब मागणाऱ्यांनाही देतात आणि त्या निर्धन-गरीबांनाही देतात, जे लाज-लज्जा आणि संकोचामुळे मागण्यासाठी तोंड उघडू शकत नाहीत." (कुरआन - ७० : २४,२५)

३) "कृपावंताचे (अस्सल) दास ते आहेत जे जमिनीवर नम्रपणे चालतात आणि अडाणी त्यांच्या तोंडी लागले तर म्हणतात की तुम्हाला सलाम. ते आपल्या

पालनकर्त्याच्या ठायी नतमस्तक होण्यात अहोरात्र उभे राहतात. जे प्रार्थना करीत असतात की, "हे आमच्या पालनकर्त्या, नरकाच्या यातनांपासून आम्हाला वाचव, त्याच्या यातना तर जीवघेण्या आहेत, ते तर फारच वाईट निवास व ठिकाण आहे." जो खर्च करतात तो न फाजील खर्च करतात न कंजुषपणा, त्यांचा खर्च दोन्ही टोकांच्या दरम्यान संतुलनावर आधारित असतो. जे अल्लाहशिवाय इतर कोणत्याही उपास्याचा धावा करीत नाहीत, अल्लाहने निषिद्ध ठरविलेल्या कोणत्याही जिवाला हकनाक ठार करीत नाहीत आणि व्यभिचारही करीत नाहीत, हे कृत्य जो कोणी करील तो आपल्या गुन्ह्याचे फळ भोगील, पुनरुत्थानाच्या दिवशी त्याला सतत यातना दिली जाईल आणि त्यातच तो सदैव अपमानित पडून राहील. याशिवाय की एखाद्याने (या अपराधानंतर) पश्चात्ताप केलेला असेल आणि श्रद्धा ठेवून तो सत्कृत्ये करू लागला असेल. अशा लोकांच्या वाईट गोष्टींना अल्लाह भल्या गोष्टींनी बदलून टाकील आणि तो अत्यंत क्षमाशील, दयावान आहे. जो मनुष्य पश्चात्ताप करून सदाचारांचा अवलंब करतो तो तर अल्लाहकडे परत येतो जसा की खऱ्या अर्थाने परतावयास हवे. (आणि कृपावंताचे दास ते आहेत) जे असत्याचे साक्षी बनत नाहीत आणि एखाद्या वायफळ गोष्टीजवळून गेल्यास ते सज्जनाप्रमाणे निघून जातात. ज्यांना त्यांच्या पालनकर्त्याचे संकेत ऐकवून जर उपदेश केला गेला तर ते त्यावर आंधळे व बहिरे बनून राहात नाहीत. जे प्रार्थना करीत असतात, "हे आमच्या पालनकर्त्या, आम्हाला आमच्या पत्नी व संततीपासून नेत्रसुख प्रदान कर आणि आम्हाला पापभीरूंचा नेता (मार्गदर्शक) बनव." हे आहेत ते लोक जे आपल्या संयमाचे फळ उत्तुंग मजल्यांच्या रूपाने प्राप्त करतील. शुभचिंतन व सलामने त्यांचे स्वागत होईल. ते सदासर्वदा तेथे राहतील, किती छान आहे ते निवास व ते ठिकाण!

हे प्रेषित (स.), लोकांना सांगा, "माझ्या पालनकर्त्याला तुमची काय गरज पडली आहे जर तुम्ही त्याचा धावा करीत नसाल. आता ज्याअर्थी तुम्ही खोटे लेखलेच आहे, लवकरच ती शिक्षा भोगाल की जीव वाचविणे कठीण होईल."

(कुरआन - २५ : ६३,६७,६८,७२,७३,७४,७५,७६)

उपरोक्त कुरआनच्या शिकवणी निश्चितच समस्त मानवजातीचे कल्याण करणाऱ्या असून मानवजातीच्या यशाची हीच गुरुकिल्ली आहे. या शिकवणी जर कोणत्याही देशाने आचरणात आणल्या तर एका अत्यंत उच्चकोटीच्या मानवसमाजाची निर्मिती होऊ शकते. आपल्या देशानेही या शिकवणी आचरणात आणल्या तर किती उत्तम होईल.

## प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या शिकवणी

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले की,

"माझ्या (आणि समस्त मानवजातीच्या) पालनकर्त्या ईश्वराने मला नऊ गोष्टींचा आदेश दिला.

१) उघड आणि छुप्या या दोन्ही अवस्थांत ईश्वराची भीती बाळगावी. (अर्थातच ईश्वरी मर्जीविरुद्ध कोणतेही कर्म करू नये.)

२) क्रोध अगर संतापाची अवस्था असो की आनंद व प्रसन्नतेची अवस्था असो, दोन्ही अवस्थेत न्यायसंमत गोष्ट करावी, न्यायाची भाषा बोलावी, न्यायसंमत भूमिका घ्यावी.

३) गरीबी असो की श्रीमंती, (प्रत्येक अवस्थेत) संतुलित आचरण करावे.

४) जी व्यक्ती माझ्याशी संबंध वा नाते तोडील तिच्याशी मी नाते जोडावे.

५) मला देण्यापासून हात रोखणाऱ्यांना मी त्यास त्याच्या गरजेची वस्तु द्यावी.

६) जी व्यक्ती माझ्यावर अत्याचार करील, मी तिला क्षमा करावे.

७) माझे मौन चिंतनपूर्ण असावे आणि मी चर्चा करावी तर ईश्वराविषयी करावी.

८) माझी दृष्टी बोध घेणारी असावी.

९) मी चांगुलपणाचा सदाचाराचा आदेश द्यावा आणि दुष्कर्मांपासून रोखावे.

खरोखरच ही किती व्यापक आणि उच्चकोटीची शिकवण आहे. ईश्वराने पाठविलेले प्रेषित समस्त मानवजातीकरिता मापदंड आणि आदर्श असतात. त्याचप्रमाणे प्रेषित मुहम्मद (स.) यांची उपरोक्त शिकवण ही त्यांची स्वतःची नसून ईश्वरानेच त्यांना दिलेली असून या शिकवणीवर आचरण केल्यास ऐहिक जीवन तर सुखी आणि यशस्वी होईलच शिवाय सर्वांत मोठे यश म्हणजे मृत्यूनंतर स्वर्गप्राप्ती होईल. याउलट या शिकवणीची अवहेलना केल्यास वर्तमान जीवनात दुःख, अशांती आणि उपद्रवाचे तर भोग भोगावेच लागतील. मात्र मृत्यूनंतरच्या जीवनात नरकयातना भोगण्याचे सर्वांत मोठे अपयश पदरी पडेल.

## प्रेषित मुहम्मद (स.) यांनी दिलेली सुशीलतेची शिकवण

प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या वचनांचे अर्थात हदीसचे प्रसिद्ध विद्वान माननीय अब्दुल्लाह बिन मुबारक (रह.) यांनी म्हटले की, "सुशीलतेची व्याख्या अशी की, माणसाने माणसाच्या प्रति प्रसन्नचित्ताने व सद्भावाने व्यवहार करावा आणि आपल्या हाताने व मुखाने इतरांना त्रास होऊ नये याची खबरदारी घ्यावी. हदीसमध्ये सुशीलतेचे अपार महत्त्व आहे.

एकदा एका व्यक्तीने प्रेषित मुहम्मद (स.) यांना विचारले की,

"उत्तम कर्म अगर कार्य कोणते आहे?"

यावर प्रेषित मुहम्मद (स.) यांनी उत्तर दिले की,

१) "सर्वांत उत्तम पुण्यकर्म 'सुशीलता' होय!" त्या व्यक्तीने हाच प्रश्न परत एकदा विचारला आणि प्रेषितांनी परत तेच उत्तर दिले. त्या व्यक्तीने आणखीन परत एकदा तोच प्रश्न विचारला, यावर प्रेषितांनी म्हटले,

"तुला इतकी साधी गोष्ट कळत नाही काय? सुशीलता म्हणजे आपल्या क्रोधावर ताबा ठेवणे होय."

२) प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले,

"महाप्रलयाच्या दिवशी जेव्हा लोकांच्या भल्याबुऱ्या कर्मांचे मोजमाप करण्यात येईल तेव्हा कर्मांच्या पारड्यात सर्वांत जास्त वजनदार पुण्यकर्म सुशीलता असेल. (अर्थात) सुशील व्यक्ती सुशीलतेच्या बळावर दिवसभर रोजा ठेवणाऱ्यांच्या आणि रात्रभर नमाज पढणाऱ्यांच्या पदावर पोचेल (आणि त्यास स्वर्गप्राप्ती होईल.) (संदर्भ : तिरमिजी)

३) प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले की, "तुम्ही ज्या ठिकाणी असाल, त्या ठिकाणी ईश्वराचे भय बाळगून आचरण करावे. (चुकून) एखादे पाप घडलेच तर (त्याचे प्रायश्चित करण्यासाठी तात्काळ) एखादे पुण्यकर्म करावे आणि लोकांशी सुशीलतेचा व्यवहार करावा." (संदर्भ - अहमद, तिरमिजी)

## दयाभावाची शिकवण

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले,

१) "जो मनुष्य इतरांवर दया करणार नाही, त्याच्यावर ईश्वरसुद्धा दया करणार नाही." (संदर्भ - बुखारी व मुस्लिम)

२) "दया करणाऱ्यांवर अतिमहान दयाळू ईश्वर दया करतो. म्हणून तुम्ही समस्त सजीवांवर दया करा, ईश्वरही तुमच्यावर दया करील." (संदर्भ - मिश्कात)

३) "तुम्ही जोपर्यंत एकमेकांवर दया करणार नाही, तोपर्यंत मुस्लिम होऊच शकत नाही."

अनुयायांनी विचारले,

"हे प्रेषिता! आम्ही सर्वच दयाळू आहोत."

यावर प्रेषित मुहम्मद (स.) उत्तरले,

"केवळ आपल्यावरच दया करणे पुरेसे नाही, यासाठी सर्वसामान्यांवरदेखील दया करावी." (संदर्भ - तबरानी)

## नम्रतेची शिकवण

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले,

१) "ईश्वर स्वयं नम्र असून नम्रताच त्याला आवडते. तो नम्रतेचे जे फळ देतो, ते कठोरतेस मुळीच देत नाही. शिवाय नम्रतेशिवाय इतर कोणत्याही कर्मावर इतके उत्तम फळ देत नाही." (संदर्भ - बुखारी)

२) "ज्या व्यक्तीत नम्रताच नसेल, त्यात इतर कोणतेही पुण्यकर्म असू शकत नाहीत." (संदर्भ - मुस्लिम)

३) "ज्या व्यक्तीत (निम्नलिखित) तीन गोष्टी असतील, तिच्यावर ईश्वराची विशेष कृपा असेल आणि तिला स्वर्गात प्रवेश मिळेल. प्रथम दुर्बलांवर नरमाईचा व्यवहार करणे, द्वितीय माता-पित्यांशी प्रेमळ व्यवहार करणे आणि तृतीय दास (आणि नोकरांवर) मेहेरबानी करणे." (संदर्भ - तिरमिजी)

## क्षमा करण्याची शिकवण

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

१) "दान केल्याने संपत्तीत घट होत नाही, तसेच जी व्यक्ती एखाद्यास क्षमा करते आणि त्याच्या चुकांकडे दुर्लक्ष करते, तर तिच्या या पुण्यकर्मांमुळे ईश्वर तिचा सन्मान वाढविते. त्याचप्रमाणे जी व्यक्ती विनय करते आणि ईश्वराच्या प्रसन्नतेखातर नम्र व्यवहार करते, ईश्वर त्या व्यक्तीवर प्रसन्न होऊन तिचा मानसन्मान वाढवितो." (संदर्भ - मुस्लिम)

२) एकदा एका व्यक्तीने प्रेषित मुहम्मद (स.) यांना विचारले, "मी आपल्या गुलामाच्या चुका किती माफ करू?" प्रेषितांनी (स.) उत्तर दिले, "दररोज सत्तर वेळा!" (संदर्भ - अबूदाऊद)

## सहिष्णुतेची शिकवण

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले,

१) "केवळ भलेमोठे वजन उचलणारा आणि कुस्तीमध्ये प्रतिस्पर्ध्यास धूळ चारणारा पहिलवान नसतो, तर आपल्या क्रोधावर ताबा ठेवणारा आणि क्रोधाच्या आहारी जाऊन ईश्वराची अवज्ञा न करणारा खऱ्या अर्थाने पहिलवान आहे."

(संदर्भ - बुखारी, मुस्लिम)

२) ईश्वराचे प्रेषित आदरणीय मूसा (अ.) यांनी एकदा ईश्वरास विचारले, "हे माझ्या पालनकर्त्या ईश्वरा! तुझ्या दासांपैकी तुला सर्वांत जास्त प्रिय कोण आहे?" ईश्वराने उत्तर दिले, "बदला घेण्याचे सामर्थ्य असूनही प्रतिस्पर्ध्यास क्षमा करणारी व्यक्ती मला सर्वांत जास्त प्रिय आहे!" (संदर्भ - बहेकी)

३) एका व्यक्तीने प्रेषित मुहम्मद (स.) यांना विनंती केली, "हे प्रेषिता! मला काही उपदेश करावे!" यावर प्रेषित उत्तरले, "आपल्या क्रोधावर ताबा ठेवा!" आणखीन काही उपदेश करावा, त्याने परत विनंती केली. यावर प्रेषित उत्तरले, "आपल्या क्रोधावर ताबा ठेवा!!"

आणखीनही काही उपदेश करावा, त्याने परत तीच विनंती केली. प्रेषितांनी देखील परत तोच उपदेश केला. (संदर्भ - बुखारी)

## सत्य आणि प्रतिज्ञापालनाची शिकवण

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले,

१) "ईश्वरास सर्वांत जास्त प्रिय गोष्ट माणसाचे सत्यवचन होय."

(संदर्भ - बुखारी)

२) "मी तुम्हास ईश्वरभयाची आणि सत्य बोलण्याची ताकीद करतो."

(संदर्भ - तजरीदुल अहादीस)

३) तुम्ही मला सहा गोष्टींचा जामीन द्या, मी तुम्हास स्वर्गप्राप्तीचा जामीन देतो. पहिली गोष्ट अशी की नेहमी सत्य बोलावे, दुसरी केलेली प्रतिज्ञा पूर्ण करावी, तिसरी घेतलेली जवाबदारी पूर्ण करावी, चौथी व्यभिचारी कृत्यांपासून आपल्या कामेंद्रियांचे रक्षण करावे, पाचवी (अनुचित आणि अश्लील गोष्टीपासून सुरक्षित राहण्याकरिता) आपली दृष्टी खाली ठेवा आणि सहावी कोणावरही अत्याचार करू नये."

(संदर्भ - हदीस संग्रह)

४) "तीन गोष्टी मुनाफिक (दांभिक आणि कपटी) असण्याची लक्षणे आहेत. प्रथम खोटे बोलणे, द्वितीय दिलेले वचन न पाळणे आणि तृतीय केलेली प्रतिज्ञा भंग करणे. (अर्थातच अशी व्यक्ती मुस्लिम असूच शकत नाही.)" (संदर्भ - सिहाह सित्ता)

५) "इतरांच्या वस्तूंवर ज्या व्यक्तीने आपला मालकी अधिकाराचा दावा केला, ती व्यक्ती आमच्यापैकी नाही (अर्थात ती व्यक्ती मुस्लिम असू शकत नाही) आणि अशी व्यक्ती नरकाग्नीचे भोग भोगेल." (संदर्भ - मुस्लिम)

## सामान्यजनांशी उत्तम व्यवहाराची शिकवण

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले,

१) "समस्त सृष्टी ईश्वराचा परिवार आहे आणि त्याच्या या परिवारजनांशी (सृष्टीतील प्रत्येकाशी) उत्तम व्यवहार करणारी व्यक्ती ईश्वरास खूप प्रिय आहे!"

(संदर्भ - मिश्कात)

२) "प्रत्येकजन तुमचा बंधु आहे आणि आपल्या बंधुस हसतमुखाने भेटणेसुद्धा दानकर्माएवढे पुण्य होय. सदाचाराचा आदेश देणे आणि दुराचारापासून रोखणेसुद्धा दान-कर्माएवढे पुण्य आहे. मार्ग भटकलेल्यास योग्य मार्ग दाखविणे, रस्त्यावरील दगड, काटा व यासारखी इतर अडचण बाजूला करणे आणि आपल्या (सामान्य) बंधुस पाणी पाजणेसुद्धा दानकर्मासम पुण्य होय." (संदर्भ - तिरमिजी)

५) अंतिम निवाड्याच्या दिवशी ईश्वर विचारील की, "हे आदमच्या संतती, हे मानवा! मी आजारी पडलो होतो, तू माझी शुश्रुषा केली नाहीस."

मनुष्य उत्तर देईल, "हे ईश्वरा! तू स्वतः सर्वांचा पालनकर्ता आहेस. मी तुझी शुश्रुषा कशी करणार?"

"माझा एक दास (मानव) आजारी होता. मात्र तू त्याची शुश्रुषा केली नाहीस. तू जर त्याची सेवा केली असती तर तुला मी तेथेच पावलो असतो, हे तुला माहीत नाही काय?"

मग परत ईश्वर विचारील, "मला भूक लागली होती, मी उपाशी होतो, मी तुला भाकरी मागितली, मात्र तू मला दिली नाही."

मनुष्य उत्तर देईल, "हे ईश्वरा! मी तुला जेवण कसे वाढणार. तू स्वतः समस्त सृष्टीचा अन्नदाता आहेस."

ईश्वर म्हणेल, "माझा एक दास (सामान्यजन) उपाशी होता, त्याने तुला भाकरी मागितली होती. मात्र तू त्याला दिली नव्हती. तू जर त्याचे पोट भरले असते तर त्याचे फळ माझ्याकडून मिळाले असते."

परत ईश्वराचा प्रश्न होईल, "हे आदमची संतान! हे मानवा!! मी तहानलेला होतो, मी तुला पाणी मागितले, मात्र तू मला दिले नाहीस!'

मानव उत्तर देईल, "हे जगाच्या पालनकर्त्या ईश्वरा! तूच स्वतः सर्व सृष्टीची तहान भागविणारा आहेस. मी तुझी तहान कशी भागवू शकतो?"

परत ईश्वराचे उत्तर की, "अरे मानवा! माझा एक बंदा (सामान्यजण) तहानलेला होता आणि त्याने तुला पाणी मागितले, मात्र तू त्यास दिले नाहीस! तू जर त्यास पाणी पाजले असते तर याचे फळ माझ्याकडून घ्यायचे असते."

(संदर्भ - मुस्लिम)

## शेजारधर्म पाळण्याची शिकवण

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

१) "ती व्यक्ती मुस्लिम असू शकत नाही, जी स्वत: पोटभरून खाते आणि तिचा शेजारी उपाशी झोपतो." (संदर्भ - मिश्कात)

२) "जेव्हा तुम्ही भाजी अगर वरण-सागुती तयार करता, तेव्हा त्यात पाणी जास्त टाकून ती वाढवा आणि त्यापैकी आपल्या शेजाऱ्याच्या घरी पाठवा." (संदर्भ - मुस्लिम)

३) "ज्याला ईश्वर आणि त्याच्या अंतिम प्रेषिताचे लाडके व प्रिय होण्याची इच्छा असेल, तर त्याने नेहमी खरेच बोलावे, जवाबदारी पूर्ण करावी आणि आपल्या शेजाऱ्याशी स्नेहपूर्ण व्यवहार करावा." (संदर्भ - मिश्कात)

४) एकदा एकाने प्रेषित मुहम्मद (स.) यांना विचारले की, "हे प्रेषिता! एक स्त्री रात्रभर नमाज पढून ईशोपासना करते, दिवसभर रोजा (अर्थात इस्लामी उपवास) ठेवते. मात्र शेजारी-पाजारींना अनुचित शब्दांचा वापर करून त्रास देते, तेव्हा तिचा परिणाम काय होईल?"

यावर प्रेषित उत्तरले, "ती स्त्री नरकाग्नीत जाईल."

यानंतर परत प्रश्न... "हे प्रेषिता! एक स्त्री केवळ अनिवार्य नमाज व इतर उपासना करते, मात्र आपल्या वाणीद्वारे कोणालाही दु:ख देत नाही."

यावर प्रेषित म्हणाले, "ती स्त्री स्वर्गात जाईल." (संदर्भ - मुसनदे अहमद)

## दुराचार व दुष्कर्मांची मनाई

१) एकदा प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आपल्या अनुयायांना विचारले, "सांगा बरे, निर्धन आणि दरिद्री कोण आहे?"

अनुयायांनी उत्तर दिले की, ज्याच्याकडे संपत्ती नाही, पैसा-अडका नाही आणि जगण्याची साधनसामुग्री नाही, तो निर्धन आणि दरिद्री समजला जातो."

यावर अंतिम प्रेषित (स.) म्हणाले, "माझ्या अनुयायांतील दरिद्री आणि निर्धन मनुष्य तो असेल जो अंतिम निवाड्याच्या दिवशी नमाज, रोजा, दानधर्म वगैरेसारखे प्रचंड प्रमाणात पुण्यकर्म घेऊन ईश्वरासमक्ष हजर होईल, मात्र त्याने जगामध्ये एखाद्यास शिवी देण्याचे पाप, एखाद्यावर खोटा आरोप ठेवण्याचे पाप केलेले असेल, एखाद्याची संपत्ती अवैध बळकावण्याचे पाप केलेले असेल, एखाद्याची हत्या तर एखाद्यास हकनाक

चोप देण्याचे पाप केलेले असेल, तर त्याचे संपूर्ण पुण्यकर्म अत्याचारपीडितांस देऊन कर्मांची परतफेड करण्यात येईल आणि यांच्याकडे एकही पुण्यकर्म बाकी उरलेले नसल्यामुळे अत्याचारपीडितांचे पाप याच्या झोळीत टाकून परतफेड करण्यात येईल. अशारितीने त्यास नरकाग्नीत झोकून देण्यात येईल.'' (संदर्भ - मुस्लिम)

२) ''स्वत:करिता जे पसंत करता, तेच इतरांसाठीसुद्धा पसंत करावे, तरच तुम्ही मुस्लिम व्हाल.''

३) जी व्यक्ती अनुचितरित्या अथवा अन्यायाने इतरांची जमीन बळकावेल, तिला अंतिम निवाड्याच्या दिवशी सात पृथ्वीच्या व्यासाएवढे खोल फेकण्यात येईल.'' (संदर्भ - बुखारी)

## व्यापारात प्रामाणिकतेची शिकवण

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

१) जी व्यक्ती खोटी शपथ घेऊन आपला माल अगर उत्पादन विकते, तिच्याकडे ईश्वर नजर उचलूनसुद्धा पाहणार नाही.'' (संदर्भ - बुखारी)

२) एकदा प्रेषित मुहम्मद (स.) नमाजकरिता घराबाहेर पडले तेव्हा त्यांना लोक खरेदी-विक्रीत व्यस्त असल्याचे दिसले, तेव्हा त्यांनी म्हटले,

''हे व्यापाऱ्यांनो! ईशपरायण व्यापाऱ्याशिवाय इतर सर्वचजण अंतिम निवाड्याच्या दिवशी अवज्ञाकाऱ्यांत सामील असतील.'' (संदर्भ - तिरमिजी)

२) ''जी व्यक्ती एखादी दोषपूर्ण वस्तु त्या वस्तुचा दोष ग्राहकास न दाखविताच विकेल, ती नेहमी ईश्वराच्या क्रोधास बळी पडलेली असेल आणि ईश्वराचे फरिश्ते तिचा धिक्कार करीत असतील.'' (संदर्भ - इब्ने माजा)

आज आपल्या देशातसुद्धा ही समस्या सर्वत्र भेडसावत आहे. कोणतीही वस्तु शुद्ध स्वरुपात उपलब्ध नाही. दूध असो की तूप, मिरची असो की बेसन, एवढेच नव्हे तर औषधीमध्ये भेसळ होत असून जनतेच्या जीवाशी क्रूर खेळ खेळला जात आहे. कायदा हतबल झालेला असून भांडवलदार आणि पूंजीवाद्यांनी कायदा व न्यायव्यवस्था धाब्यावर बसवून तिजोरी भरत आहेत. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

३) ''खरेदी-विक्रीत खरे बोलावे, तरच तुमच्या संपत्ती आणि वैभवात वाढ होईल. जेव्हा खोटे बोलून व वस्तुतील दोष लपवून विक्री कराल (ग्राहकास धोका देऊन पैसे कमवाल तर व्यापारातील बरकत (वृद्धी) निघून जाईल.'' (संदर्भ - मुस्लिम)

## अवैध व अनुचित पद्धतीने संपत्ती मिळविणे

१) माननीय साद बिन वक्कास (रज़ी.) यांनी प्रेषित मुहम्मदांना (स.) निवेदन केले की, "हे प्रेषिता (स.)! माझ्याकरिता प्रार्थना करावी की ईश्वरादरबारी माझी प्रार्थना स्वीकृत होत राहावी." यावर प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले, "आपली उपजीविका शुद्ध करा (अर्थात केवळ वैध पद्धतीनेच संपत्ती मिळवा) कारण ईश्वराची शपथ! जी व्यक्ती हरामाच्या कमाईने (अवैध कमाईने) आपले पोट भरते, तर चाळीस दिवसांपर्यंत ईश्वर त्याचे कोणतेही पुण्य स्वीकार करीत नाही. ज्या व्यक्तीचे शरीर हरामाच्या (अवैध व निषिद्ध) कमाईवर पोसले असेल, त्याचे स्थान निश्चितच नरकाग्नी होय."

(संदर्भ - तबरानी)

२) एखाद्या व्यक्तीने हरामाच्या (अवैध) कमाईतून किती जरी दानधर्म केले, तर त्यास याचे पुन्य मिळण्याऐवजी उलट पापच मिळेल." (संदर्भ - बुखारी व मुस्लिम)

आज आपण पाहतो की लोक ईश्वर आणि पाप व पुण्य तसेच परलोकी जीवन वगैरेवर विश्वास ठेवीत नाहीत आणि जे विश्वास ठेवण्याचा दावा करतात. तसेच दानशूर व धर्मात्मा म्हणवून घेऊ इच्छितात, ते दोन्ही-दोन्ही हातांनी अवैध आणि हरामाची संपत्ती समेटून घेत आहेत व त्यापैकी थोडेसे परमार्थात खर्च करून समजतात की आपण खूप पुण्य केले.

## भ्रष्टाचार आणि लाचलुचपत

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

१) "जी व्यक्ती एखाद्या समाजाची अधिकारी अथवा न्यायाधीश असेल, अंतिम निवाड्याच्या दिवशी ती व्यक्ती ईश्वरासमोर अशा अवस्थेत हजर करण्यात येईल की तिचे हात तिच्या गळ्यात बांधलेले असतील. मग ती व्यक्ती जर भ्रष्टाचार न करणारी आणि लाच व घेणारी असेल, तिने जगात पूर्ण न्यायनिष्ठेने आपली कर्तव्ये बजावली असतील तर ती व्यक्ती मुक्त करण्यात येईल. मात्र असे नसल्यास किंवा लोकांकडून लाच घेऊन त्यांची कामे करीत असलेली असेल, लोकांकडून पैसा घेऊन त्यांच्या बाजूने निकाल देत असेल, तर ती व्यक्ती नरकाग्नीत झोकून देण्यात येईल आणि पाच वर्षे अंतराच्या खोल गर्ततेत जाऊन पडेल." (संदर्भ - तबरानी)

आजकाल अधिकाऱ्यांची आणि कर्मचाऱ्यांची अवस्था आपण डोळ्यांनी पाहतो आहोत. सर्वत्र भ्रष्टाचार आणि लाचलुचपत प्रचंड प्रमाणात बोकाळलेले आहे. परिस्थिती

अत्यंत गंभीर आणि स्फोटक झालेली असून न्यायव्यवस्था आणि कायदासुद्धा हतबल झालेला आहे. पैसा असेल तर कितीही मोठा अपराध करून सुटता येते. सर्वत्र घोटाळे, घपले चालू आहेत. पैशांचे वजन ठेवल्याशिवाय सरकारी अर्ज वरील टेबलावर सरकत नाही. लाच दिल्याशिवाय कोणतेही काम होत नाही. जणू सर्वांच्या प्रवृत्ती आणि स्वभावातच हे पाप रक्ताप्रमाणे नसानसांत भिनले आहे.

मागील पानांवर अत्यंत संक्षिप्तरीत्या मानवतेसंबंधी इस्लामी शिकवणी सादर करण्याचा प्रयत्न केला. या शिकवणी तर इस्लामचा केवळ एक नमुना होय. या पुस्तकाच्या प्रारंभीच स्पष्ट करण्यात आले की, इस्लामच्या समस्त शिकवणी या ईश्वरत्व, प्रेषितत्व आणि परलोकी जीवनाच्या धारणांच्या आणि घनिष्ठ विश्वासाच्या धुरेभोवती भ्रमण करतात. उपरोक्त मजकुरामध्ये इस्लामच्या जेवढ्या शिकवणी सादर करण्यात आल्या, त्यांचा मूळ आधार याच तीन धारणा (मुळात एकच धारणा) होय. हेच वैशिष्ट्य इस्लामी शिकवणी आणि नियमांना सदैव कार्यरत ठेवते. जर तुम्ही उपरोक्त शिकवणींचा लक्षपूर्वक अभ्यास केला असेल तर हे निश्चितच लक्षात येईल की, आपल्या देशास (आणि समस्त जगालाच) या शिकवणींची किती नितांत गरज आहे. याशिवाय इस्लामच्या वर सादर करण्यात आलेल्या शिकवणी श्रीकृष्ण आणि मनूजींच्या 'मानव-धर्म' या साधारण मानवी कर्तव्य असल्याचे स्पष्टपणे आढळते. एवढेच नव्हे तर त्यापेक्षाही काही अधिक असल्याचे जाणवते. मुळात या इस्लामी शिकवणींवर भारतातील सर्वच धर्म आणि संप्रदायांच्या लोकांना आचरण करण्यात कोणतीही अडचण नाही. खरेपाहता या शिकवणी प्रत्येक धर्माची संयुक्त संपत्ती होत.

या शिकवणींचे महत्त्व देशाच्या पंचवार्षिक योजनांपेक्षाही अधिक आहे. सत्य, प्रामाणिकता, न्यायनिष्ठा, शुद्ध आचरण व यासारख्या बाबीं जोपर्यंत देशात व्यवहारप्रचलित होणार नाहीत आणि बेईमानी, छलकपट, स्वार्थ, अवैध मुनाफेखोरी, साठेबाजी, कृत्रिम महागाई, भ्रष्टाचार, घोटाळे, लूटमार, व्यभिचार आणि इतर अन्याय व अत्याचार समूळ नष्ट होणार नाही. दुसऱ्या शब्दांत मानवतेची स्थापना होणार नाही, तोपर्यंत कोणतीही योजना वस्तुत: यशस्वी होणार नाही. हे सर्व अमानवी बिघाड असताना आपण कितीही प्रगती केली तरी ती निश्चितच अस्थायी व अन्याय आणि अत्याचारपूर्णच असेल. देशाचेच काय आपले स्वत:चे देखील कल्याण होणे हे केवळ एक दिवास्वप्न ठरेल. मात्र झोपेतून उठल्यावर जेव्हा डोळ्यांना सत्याचे दर्शन घडेल, तेव्हा ते सत्य खूप विदारक आणि भयानक असेल!

# प्रकरण चौथे

# मानवी मूल्यांच्या उत्थानात इस्लामी मूळ धारणांचे योगदान

**लेखक : मुहम्मद जैनुल आबिदीन मन्सुरी)**

व्यक्ती असो की समाज असो, त्याची जशी धारणा आणि जीवनसिद्धान्त असतात, तसेच भाव आणि भावना व विचार जन्म घेतात. भावना आणि विचारांनुसारच आचरण, व्यवहार आणि चरित्र, नीतीमत्ता, संस्कृती व सभ्यता निर्माण होते. इस्लामची मूळ धारणा एकेश्वरवाद, प्रेषितत्व आणि परलोकवाद होय. इस्लामी समाज आणि जीवनपद्धती तसेच संस्कृती ही प्रत्येक काळ, प्रत्येक भूक्षेत्र आणि प्रत्येक क्षणी याच तीन मूळ धारणांच्या केंद्रबिंदूभोवती भ्रमण करीत असते. पुढील मजकुरात याच परिक्षेत्रात हे पाहू या की, मानवी मूल्यांच्या स्थापना आणि उत्थानात तसेच मानवजातीसाठी मानवतेचा राजमार्ग प्रशस्त करण्यात इस्लामी मूळ धारणांचे कसे आणि कोणते योगदान आहे!

## एकेश्वरवादाची धारणा

केवळ एकाच ईश्वरावर विश्वास ठेवणे हे मानवी प्रकृतीचे मूलभूत अंग होय. याच विश्वासासह 'ईश्वरोपासना' मानवाची नैसर्गिक व मूळ प्रवृत्तीसुद्धा आहे. मात्र मानव-इतिहासाच्या विभिन्न चरणात ईश्वराबरोबर त्याच्या गुणधर्म आणि अधिकारांत अनेक इतर शक्ती, व्यक्ती अगर वस्तुंना भागीदार करुन विशुद्ध एकेश्वरत्वास प्रदूषितही करण्यात आले. परिणामी मनुष्याची स्वाभाविक प्रवृत्ती आणि मूळ प्रकृती धुमील व विकारग्रस्त होत राहिली आणि याचे घोर कुप्रभाव मानवी मूल्यांवर पडले. इस्लामने मनुष्यास एकेश्वरत्वाचे आवाहन करून त्याच्या एकेश्वरवादी मूळ प्रवृत्तीस त्याच्या चेतनेच्या स्तरावर आणण्याचे कार्य केले. तसेच त्यास अनेकेश्वरत्वापासून रोखून त्याच्या प्रवृत्तीतील विकार दूर केले आहेत. त्याचप्रमाणे दुसरीकडे इस्लामने या दिशेत विशेष सक्रियता आणि क्षमतेचा पुरावा देत हे स्पष्ट केले की एकेश्वरवादी पद्धतीची ईश्वरोपासना असलेल्या इस्लामी धारणा व पद्धतीने मानवसमाजात मानवी मूल्यांची उत्पत्ती आणि उन्नती व स्थापनेत कसे अनुपम, बहुपक्षीय व बहुउद्देशीय योगदान दिले आहे.

## ईश्वरोपासना

ईश्वरोपासनेची संकल्पना ही इस्लामेतर धर्मांत केवळ 'पूजा-पाठ'पुरतीच मर्यादित आहे. मात्र इस्लामी ईश्वरोपासनेत तीन परस्पर संलग्न व अविभाज्य घटक सामील आहेत, पहिला घटक ईश्वराची पूजा, दुसरा घटक ईश्वराची आज्ञापालन आणि तिसरा घटक हा ईश्वराच्या दासत्व, गुलामीसह जीवनाच्या प्रत्येक बाबतीत, प्रत्येक क्षेत्रात ईश्वरासमक्ष पूर्णतः आत्मसमर्पण होय. याच तीन आधारांवर इस्लामी

ईश्वरोपासनेची पूर्ण इमारत उभी आहे. या अवधारणेनुसार मनुष्याचे समस्त जीवन ईश्वरोपासनेत व्यतीत होत असते. कुरआननुसार मनुष्याचे सृजन याच ईश्वरोपासनेच्या उद्दिष्टासाठी करण्यात आले. (संदर्भ - कुरआन - ५१ : ५६) मानवजातीकरिता या व्यापक ईश्वरोपासनेसाठी इस्लामने मुख्यत्वे अशा चार पद्धती निर्धारित केल्या, ज्या समस्त सत्यनिष्ठ ईशपरायण मनुष्यावर अनिवार्य आहेत. या पद्धती मानवजीवनाच्या आध्यात्मिक, मानसिक वा व्यावहारिक अशा प्रत्येक स्तरावर उच्च भाव-विचार, श्रेष्ठ आचार-व्यवहार, उच्च नैतिकता व उत्तम चारित्र्य तसेच उत्कृष्ट मानवी मूल्यांच्या स्थापनेचे व उत्थानाचे एकमेव साधन सिद्ध होतात. या पद्धती नमाज, रोजा, जकात आणि हज होय. आता आपण एकेका पद्धतीवर स्वतंत्रपणे चर्चा करु या.

## १) नमाज

नमाज ही ईश्वरोपासनेचे सामान्य रूप होय. नमाज म्हणजे बाह्यत: काही ठराविक मुद्रांमध्ये उभे राहणे, झुकणे, जमिनीवर गुडघे, हात आणि मस्तक टेकणे, उठणे, बसणे आणि काही विशिष्ट मंत्र व कुरआनाचा काही भाग पठण करणे होय. मात्र खरी गोष्ट अशी की, ही क्रिया मानवास खरा मानव बनविण्याचा एक अद्‌भूत, अद्वितीय कार्यक्रम व व्यावहारिक प्रशिक्षण आहे. पूर्ण चेतना आणि एकाग्रतेसह नमाज पढण्यात आल्यास याद्वारे इस्लामचे अनेकानेक मानवी गुण व्यक्ती आणि समाजात निर्माण होणे व त्यांत दिवसेंदिवस प्रगती होणे निश्चित होय. यापैकी काही खालीलप्रमाणे आहेत.

मन, मस्तिष्क, शरीर, वस्त्र आणि स्थानाचे पावित्र्य, स्वच्छता व शुद्धतेची अशी स्थिती निर्माण होते, जी आत्मशुद्धी आणि आत्मोन्नतीकरिता अनिवार्य आणि ईश्वरोपासनेत साहाय्यक आहे.

दररोज पाच वेळा अनिवार्य व नियमित रुपाने ईश्वराशी संबंध स्थापन होतात, त्याची आठवण, त्याचे स्मरण होत असते. प्रत्येक ठिकाणी ईश्वराची आपल्यावर नजर व मेहेरनजर असल्याची जाणीव असते. आपल्या प्रत्येक क्रिया व कर्मांना ईश्वराच्या अत्यंत सूक्ष्मतेसह पाहात असल्याच्या जाणिवेमुळे विश्वास ताजा आणि दृढ होत असतो. ही जाणीव आणि विश्वास मनुष्यामध्ये उत्तरदायित्वाचा अत्यंत मौल्यवान गुणधर्म निर्माण करतो.

मनुष्यात समयनिष्ठा आणि नियमनिष्ठेचे सद्‌गुण निर्माण होतात, जे मानव-जीवनात प्रगती आणि विकासासाठी अत्यंत महत्त्वपूर्ण गुण आहेत.

लहान-मोठे, गरीब-श्रीमंत, मालक-नोकर, अधिकारी-कर्मचारी, मजूर-व्यापारी, शिक्षित-अशिक्षित, कुरुप-सुंदर, राजा-रयत, शासक-शासित... वगैरे सर्वांचेच प्रतिनिधित्व करणारे लोक कानाकोपऱ्यातून अगदी वेळेवर मस्जिदमध्ये शिस्तबद्धपणे हजर होतात, अगदी एका सरळ रांगेत खांद्यास खांदा जोडून नमाज अदा करतात. येथून

ते ही भावना आणि विश्वास घेऊन आपापल्या कार्यक्षेत्रात जातात की ईश्वराच्या दृष्टीत सगळेच मानव समान आहेत. त्याच्या दृष्टीत कोणीही उच्च नाही व कोणीही नीच नाही. कोणीही जन्मजात पवित्र व अपवित्र नाही. मनुष्य हा केवळ ईश्वराचा दास आहे. ईश्वराच्या दृष्टीमध्ये आर्थिक, राजकीय व वर्ण-वंशासंबंधी कोणत्याही प्रकारची विषमता मूल्यहिन आहे. या गोष्टीची प्रेरणा दिवसभरात एकदा नव्हे तर पाचवेळा मिळत असते.

दररोज पाच वेळा सामूहिकरित्या समयबद्ध नमाज अदा केल्यामुळे मनुष्यात शिस्ती बरोबरच शिष्टाचार निर्माण होतो. वारंवार या प्रवृत्तीमुळे माणसांदरम्यान घनिष्ठ संबंध निर्माण होतात आणि समाजात अधिकाधिक दृढता निर्माण होते. या प्रक्रियेमुळे कोणतीही व्यक्ती समाजापासून विभक्त होऊन आणि गाव, गल्ली, शेजार-पाजारापासून दूर होऊन एकलकोंडे जीवन जगू शकत नाही, जसे आजच्या भौतिकवादी जीवनशैलीत... विशेषतः वर्तमान यंत्रयुगात होताना आपण पाहतो.

सामूहिक नमाजीकरिता निमंत्रण अर्थात 'अजान'मध्ये ईश्वराच्या असीम, अनंत, अपार व अद्वितीय महिमत्वाची 'अल्लाहु अकबर' या शब्दाने घोषणा करण्यात येते. ही घोषणा अगर आवाहन दिवसभरात पाच वेळा अनिवार्यरित्या करण्यात येते. या घोषणेची दोन शैली एक सकारात्मक आणि दुसरी नकारात्मक होय. सकारात्मक शैलीनुसार हे स्वीकार करण्यात येते की, त्याची शक्ती आणि प्रभुत्व महिम आहे. त्याची दया व कृपा अपार आणि त्याचा प्रकोप अतिशय भयानक आहे. त्याची विद्वत्ता, तत्त्वदर्शिता व त्याचे ज्ञान महानतम आहे. याबरोबरच नकारात्मक पैलू असा की, मानव, जीव-जंतु अगर ब्रह्मांडातील कोणत्याही वस्तुमध्ये ईश्वराच्या तुलनेत कोणत्याही प्रकारची शक्ती, महिमत्व, सामर्थ्य स्वीकार करणे शक्यच नाही. हा विश्वास प्रत्येक नमाजमध्ये वारंवार दृढ आणि पुनरावृत होत राहात असल्याने माणसाच्या भाव-विचार आणि व्यवहार तसेच चारित्र्यावर दोन दिशांकडून रचनात्मक व सुधारात्मक प्रभाव पडतात.

१) पहिला प्रभाव असा की, मनुष्य हा स्वतःच आपली बढाई नाकारतो. स्वतःचा मोठेपणा आणि अहंकार नष्ट करतो. यामुळे व्यर्थ स्वाभिमानास आणि अहंकारास मूठमाती मिळत असल्याने व्यक्ती व समाजाच्या प्रगतीसाठी हानीकारक असलेल्या कुत्सित भावनांची होळी होते. परिणामी आपल्यापेक्षा दुर्बल, निर्धन. आणि पामर असलेल्यांवर अन्याय व अत्याचार तसेच त्यांचे शोषण करण्यापासून परावृत्त होतो.

२) दुसरा प्रभाव असा की, माणूस आपल्यापेक्षा जास्त सामर्थ्यशाली माणसाचे श्रेष्ठत्व बिनधास्तपणे झुगारून लावतो. परिणामी अशा तथाकथित श्रेष्ठ आणि बड्या

मंडळीच्या दबावास अगर अमिषास बळी पडून कोणतेही अनुचित, अमानवी व अन्यायी काम करीत नाही. तो कोणाच्याही सुलतानी बळास अगर सामर्थ्यास घाबरून अथवा त्यांची मर्जी राखण्यासाठी सत्याची व न्यायाची कास सोडत नाही आणि कोणत्याही अवैध मार्गाचा अवलंब करीत नाही.

म्हणून 'अल्लाहु अकबर' (ईश्वरच महान आहे) हे दोनच शब्द पूर्ण विवेक आणि बुद्धीसह अदा करण्यात यावेत, जे नमाजच्या माध्यमाने निश्चित करण्यात आले आहेत. हे दोनच शब्द व्यक्ती व समाजास मनस्विता आणि उच्चमानवतेच्या गुणांनी अलंकृत करण्यासाठी पुरेसे आणि सक्षम आहेत.

एका उत्तम समाज आणि त्याच्या समष्टीय व्यवस्थेकरिता चारित्र्यवान नेतृत्वाची निवड आणि त्याच्या अनुकरणाची परम आवश्यकता असते. सामूहिक नमाजमध्ये इमामचा (अर्थात नमाजचे नेतृत्व करणाऱ्याचा) दर्जा हा उच्च गुणवत्ता आणि उत्तम चारित्र्याच्या दृष्टीने या गोष्टीचे प्रतीक असते की, सामाजिक व समष्टीय व्यवस्थेचे नेतृत्वदेखील गुणवान, प्रामाणिक, न्यायनिष्ठ आणि उत्तम चारित्र्य असलेल्या लोकांच्या हाती देण्यात यावे. अशा उत्तम दर्जाच्या आणि ज्ञानी इमामाची (नमाजचे नेतृत्व करणाऱ्याची) निवड केल्यावर ज्याप्रमाणे त्याच्या नेतृत्वामध्ये नमाज पढणारे समस्त लोक त्याचे पूर्णपणे अनुकरण करतात आणि नमाज पढतेवेळेस ज्याप्रमाणे आपल्या वैयक्तिक आवडी-निवडी व सवयी बाजूला ठेवूनच अनुकरण करतात, अगदी त्याच प्रकारे सामाजिक, राजकीय अगर कोणत्याही सामूहिक व्यवस्थेचे नेतृत्व हे सर्वांत उत्तम चारित्र्याच्या व्यक्तीस सोपविण्यात यावे आणि मग अनुशासित व सुसंगठित राहून आपापल्या वैयक्तिक इच्छा, आवडी-निवडी, नफा-तोटा वगैरेंचा विचार न करता आपल्या या उत्तमोत्तम चारित्र्यवान इमामाचे (अर्थातच नेत्याचे) आदेशपालन करण्यात यावे. याप्रकारे हेच विदित होते की, 'नमाज' हे एका उत्तम व आदर्श समाजाच्या सृजनामध्ये अथवा उभारणीमध्ये एक अत्यंत महत्त्वपूर्ण भूमिका निभावते. या वैशिष्ट्यांना पूर्णत: लक्षात घेऊन जर नमाज अदा करण्यात आली तर यामुळे निश्चितच मानवी समाजामध्ये मानवी मूल्ये अत्यंत सक्रियपणे स्थापन होतील आणि समाजात न्याय, सुख, शांतीचे नंदनवन बहरेल.

## २) रोजा (इस्लामी पद्धतीचा उपवास)

इस्लामी पद्धतीच्या उपवासास 'रोजा' असे म्हटले जाते. तसे पाहता इतरही काही इस्लामेतर धर्मात उपवासास मान्यता आहे, मात्र इस्लाममध्ये 'रोजाला' ईश्वरोपासनेच्या रूपाने विशेष महत्त्व प्राप्त आहे. सलग एक महिना रोजा ठेवण्यासाठी 'अरबी' दिनदर्शिकेच्या नवव्या महिन्याचे अर्थात 'रमजान' महिन्याचे निश्चितीकरण करण्यात आले आहे. याच महिन्यात कुरआनचे सृष्टीमध्ये अवतरण झाल्याचे कुरआनात म्हटले

गेले आहे. (संदर्भ : कुरआन - २:१८५) कुरआन ही स्वयं मानवजाती आणि समस्त सृष्टीचा निर्माता, पालनकर्ता, स्वामी व प्रभू ईश्वराची वाणी असून मानवतेची खरी व्याख्या करणारा हा ग्रंथ होय. या ग्रंथात कोणत्याही प्रकारचा मानवी हस्तक्षेप नसून साडे चौदाशे वर्षांपासून सर्वथा सुरक्षित आहे. मानवतेची वास्तविकता, प्रवृत्ती, सद्‌गुण, दुर्गुण गरजा, लाभदायक वैधता, नुकसानकारक अवैधता आणि समस्त जीवनपद्धती अत्यंत सूक्ष्मपणे व रहस्यमयरित्या या ग्रंथात ईश्वराने स्पष्ट केले आहे. कारण ईश्वराचे ज्ञान अपार, त्याची तत्त्वदर्शिता असीम व अनंत आहे. म्हणूनच हा ग्रंथ अंतिम ईशग्रंथ असल्याने मानवतेच्या सर्वार्थ कल्याणाचे एकमेव सूत्र आहे. रमजानमध्ये कुरआनाचे पठन, चिंतन-मनन आणि अर्थ-भावार्थांचे विश्वव्यापी अध्ययन होत असते.

खरे पाहता ईशपरायणता (म्हणजेच ईशप्रकोपाचे भय बाळगून त्याच्या मर्जीनुसार जीवन जगण्याची धारणा) ही एका शांतीपूर्ण, यशस्वी व्यवस्था आणि आदर्श मानवी मूल्यांची कायमस्वरुपी आधारशिला होय. हीच ईशपरायणता मानवामध्ये निर्माण करण्यासाठी कुरआनने रोजा अनिवार्य ठरविला आणि रोजाचे मूळ ध्येय हीच ईशपरायणता मानवामध्ये निर्माण करणे होय. (संदर्भ : कुरआन - २:१८३) रोजाच्या माध्यमाने मानवसमाजात जी मानवी मूल्ये आणि सद्‌गुण निर्माण होतात, ते आम्ही येथे देत आहोत.

माणूस हा कोणत्याही अवस्थेत असो, कोणत्याही ठिकाणी व कोणत्याही क्षेत्रात असो, एकांतात असो की सामूहिक जीवनात असो, त्याच्या प्रत्येक हालचाली आणि कार्यावर ईश्वराची दृष्टी असते. यावर माणसाचा दृढ विश्वास रमजान महिन्यातील अनिवार्य रोजांच्या माध्यमाने दररोज माणसात निर्माण करण्याचा सराव होत असतो. यामुळे त्याच्यात एक असा जबरदस्त सद्‌गुण निर्माण होतो, जो पोलिस, न्यायालय आणि शिक्षा व दंडाच्या भीतीशिवाय माणसास वाईट कर्म व अपराधांपासून दूर ठेवतो. या धारणेमुळे माणसाला पोलिसांची आणि शिक्षा वा दंडाच्या भीतीची गरजच नसते. ईशभयामुळे तो आपोआपच पातक कर्मांपासून स्वतःस दूर ठेवतो. अर्थातच यामध्ये मानवामध्ये असलेल्या ईशपराणाची महत्त्वाची भूमिका आहे. कारण ईश्वराची दृष्टी, त्याचे ज्ञान, शक्ती व क्षमता ही जगातील पोलिस, कोर्ट आणि न्यायालयाप्रमाणे सीमित, पक्षपाती व दोषपूर्ण नाही.

मानवप्रेम, दयाभाव, क्षमाशीलता, आत्मसंयम, निश्चयशक्ती, इच्छासामर्थ्य तसेच निर्धन व दीन-दलित आणि दुर्बलांची मदत, जनसेवा, बंधुभाव, स्नेह वगैरेसारख्या उच्च मानवी मूल्यांची जी शिकवण इस्लामने आपल्या अनुयायांना सामान्य जीवनात नेहमीसाठी

अमलात आणण्यासाठी दिली आहे, रमजान महिन्यात यावर विशेष जोर देण्यात येत असतो. याकरिता त्यांना विशेष तऱ्हेने प्रेरित करण्यासाठी त्यांच्यात या गोष्टीचा विश्वास निर्माण करण्यात आला की, ही सगळी चांगुलपणाची कामे तसेच दान-पुण्य वगैरे जर नि:स्वार्थी भावनेने, प्रसिद्धी आणि वाहवा मिळविण्याच्या कुत्सित उद्दिष्टांपासून मुक्त आणि कोणासही उपकारांची जाणीव करून न देता केवळ आणि केवळ ईश्वराच्याच प्रसन्नतेखातर व इहलोक आणि परलोकात यश मिळविण्याखातर केल्यास रमजानव्यतिरिक्त करण्यात आलेल्या याच कर्मांच्या पुण्यापेक्षा सत्तर पटीने जास्त पुण्य लाभेल. ईश्वराने आपल्या अंतिम प्रेषितांच्या (स.) मार्फत याचे वचन दिले आहे. प्रेषितत्व आणि परलोकत्वावर (याचे स्पष्टीकरण पुढील प्रकरणात येईलच) मुस्लिम व्यक्तीचा दृढ विश्वास त्याला यासाठी अतिशय प्रबळरित्या प्रेरित करतो की त्याने उपरोक्त कार्यात महिनाभर प्रयत्नशील व अग्रेसर राहावे. अशा प्रकारे रमजान समस्त इस्लामी समाजासाठी एक स्वयंचलित प्रशिक्षणाचा तसेच उच्च मानवी मूल्ये व गुणांची निर्मिती व वृद्धीचा महिना ठरतो.

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी अशी चेतावनीपूर्ण व ताकीदपूर्ण शिकवण दिली की, ''ज्या व्यक्तीने रोजा ठेवण्याच्या अवस्थेमध्ये खोटे बोलणे सोडले नाही तर ईश्वराला त्या (खोटे बोलणाऱ्या) व्यक्तीच्या 'रोजा' ठेवण्याशी काहीही देणे घेणे नाही. मुळात यामुळे रोजा ठेवणे नसून केवळ उपाशी-तापाशी राहण्यापेक्षा जास्त काहीही साध्य होणार नाही.'' याचाच अर्थ असा झाला की रोजा ठेवल्यावर खोटे बोलू नये, नसता रोजाचे पुण्य त्यास मिळणारच नाही. इस्लामी शरीयतमध्ये अर्थात इस्लामी विधीमध्ये खोटे बोलणे हे घोर पाप ठरविण्यात आलेले असून ते एकार्थाने असंख्य पाप आणि दुष्कर्मांची जननी होय. अशा असंख्य पापकर्मांपासून स्वत:स दूर ठेवण्याचे जबरदस्त अध्यात्मिक प्रशिक्षण रोजाच्या माध्यमाने संपूर्ण रमजान महिन्यात देण्यात येते.

खोटे बोलण्याप्रमाणेच अपशब्द, शिवीगाळ, इतरांचे मन दुखावण्यासारखे आणि अपमानास्पद शब्द वापरणे, चुगली, चहाडी, परनिंदा, आक्रोश, क्षोभ, खोटा आरोप, परचारित्र्यहनन, अश्लीलता, अभद्रता आणि कलह, तिरस्कार, वगैरेसारख्या दुर्गुणांपासून मुक्त राहण्याकरिता रोजामुळे आत्मबल निर्माण करण्यात येते. कारण याच दुर्गुणांमुळे मानवीय मूल्यांची होळी होत असते.

संपन्न, श्रीमंत आणि वैभवशाली लोकांना या गोष्टीची प्रखर आणि तीव्र जाणीव होते की, निर्धन, दीन-पददलित आणि दरिद्री तसेच जीवन-सामुग्रीपासून वंचितांची भूक आणि तहानेमुळे कशी अवस्था होत असेल, याच जाणिवेमुळे श्रीमंतांच्या हृदयात

गोरगरीबांविषयी दयाभाव आणि कृपेचे पाझर फुटते. मानवतेचा हाच अत्यंत महान आणि अत्यावश्यक असलेला गुणधर्म रोजारूपी ईश्वरोपासनेच्या माध्यमानेच निर्माण होतो आणि वस्तुत: हे केवळ इस्लामचेच श्रेय आणि ईशोपासनेच्या इस्लामी अवधारणेचेच वैशिष्ट्य होय. या ठिकाणी हेदेखील विसरता कामा नये की, रमजानचे रोजे धरणे हे काही वैकल्पिक अगर ऐच्छिक कर्म नसून अनिवार्य उपासना आहे. इस्लामी कायद्यानुसार कोणत्याही उचित कारणाशिवाय केवळ एक रोजा न धरण्याचा दंड सलग साठ रोजे धरणे निश्चित करण्यात आलेला आहे.

ज्याअर्थी कामवासना आणि लैंगिक प्रवृत्ती मानवाकरिता शारीरिक आनंद आणि आत्मप्रसन्नतेचे आणि मानवजातीच्या अस्तित्व, विस्तार व उन्नतीसाठी एक निसर्गदत्त साधन आहे, त्या ठिकाणी हीच बाब (अर्थात कामवासना अगर लैंगिक प्रवृत्ती) वैध नियमांचा भंग करते आणि नैतिक मर्यादा ओलांडने अथवा माणूस आपल्या कामवासनांवर ताबा न ठेवता लिंगपिसाटपणे सैरावैरा धावत सुटतो, तेव्हा याचे परिणाम समाजावर अत्यंत भयानक होतात. ही एक अशी सर्वस्वीकृत वास्तविकता आहे की, यासाठी कोणत्याही पुराव्याची मुळीच गरज नाही. इस्लामने मानवता, मानवसमाज तसेच मानव-चारित्र्याचा निर्घृणपणे बळी घेणाऱ्या या महाविनाशकारी संकटाच्या निवारणासाठी ज्या ठिकाणी स्थायी स्वरुपाचे अनेक आदेश आणि शिकवणी प्रदान केल्या, ज्या ठिकाणी यौनसंबंधाच्या नियमांची पायमल्ली रोखण्यासाठी अत्यंत कठोर कायदा आणि कडक शिक्षेची तजवीज केली, पारिवारिक व सामाजिक जीवनात अध्यात्मिक, नैतिक आणि व्यावहारिक स्तरावर यौनसंबंधी सुरक्षेची दनकट कवचकुंडले प्रदान केली, त्याच ठिकाणी रोजाच्या माध्यमाने स्त्री-पुरुष दोघांनाही कामोत्तेजनेवर ताबा मिळविण्याचे प्रशिक्षण अतिशय प्रभावशालीरित्या देण्यात आले. रोज्याच्या अवस्थेत पती-पत्नीदरम्यान यौनक्रिया वर्जित ठरविण्यात आली आहे. अशा प्रकारे रोजाच्या माध्यमाने सतत महिनाभर कामोत्तेजनेवर ताबा ठेवण्याचा सराव करविण्यात येतो.

याबरोबरच समाजातील श्रीमंत लोकांचा निर्धनांशी स्नेहपूर्ण संबंध ठेवण्याचा तसेच त्यांच्याशी सहानुभूती, दयाभाव आणि कृपापूर्ण व्यवहार ठेवण्याचासुद्धा सराव करविण्यात येतो. एखाद्या व्यक्तीस एखाद्या 'उचित कारणास्तव' रोजा धरणे शक्य न झाल्यास (हे 'उचित कारण' शरीयतने अर्थात इस्लामी कायद्याने ठरविले आहे) त्याने नंतर संधी मिळताच रोजा धरावा. अगर हेदेखील शक्य न झाल्यास याच्या प्रायश्चित्तास्तव एका गरीबास जेवण करविण्यात यावे. याशिवाय आणखीनही एखाद्या उचित कारणास्तव हेदेखील जमले नाही तर सलग दोन महिने रोजे धरावे अथवा साठ गरीबांना जेवण द्यावे.

सलग महिनाभर रोजारूपी ईश्वरोपासना करण्यात लीन राहिल्यावर ईश्वराचे आभार मानन्याकरिता 'ईदुलफित्र'ची सामूहिक नमाज अदा करण्यात येते. इस्लामी शिकवणीनुसार ही नमाज ईश्वराने स्वीकारावी म्हणून अनिवार्यरित्या अबालवृद्धांतर्फे एक निश्चित राशी गरीबांना दान देण्यात येते. याच दानराशीला 'सदका-ए-फित्र' असे म्हणतात. इस्लामने स्पष्ट केले आहे की, गरीबीमुळे कोणताही माणूस ईदच्या दिवशी आनंद साजरा करण्यापासून वंचित राहता कामा नये. गरिबांना दारिद्र्याची मुळीच जाणीव होता कामा नये. श्रीमंत आणि गरिबांत कोणत्याही प्रकारची दुही निर्माण होता कामा नये. श्रीमंताविषयी गरिबांच्या मनात कोणत्याही प्रकारचा द्वेष, ईर्ष्या आणि मत्सराची भावना निर्माण होऊ नये.

रोजाच्या माध्यमाने एका महिन्यापर्यंत सतत असंख्य व अमूल्य मानवी मूल्ये, गुणांच्या उत्पत्ती, स्थापना व विकासाचा अभ्यास तसेच प्रशिणाच्या माध्यमाने ईश्वरोपासनेच्या या महान प्रयोजनाद्वारे पुढील अकरा महिन्यांपर्यंत इस्लामच्या अनुयायी समाजासाठी मानवतेचा मार्ग प्रशस्त करण्यात येतो आणि हा क्रम दरवर्षी सुरुच असतो.

### ३) जकात

अर्थसंपन्न असलेल्या प्रत्येक मुस्लिम स्त्री-पुरुषावर 'जकात' म्हणजेच निश्चित राशीचे दान ईश्वराने अनिवार्य ठरविले आहे. इस्लामी कायद्यानुसार ज्या धनराशीवर जकात देण्याचा आदेश देण्यात आला आहे, त्याचे उल्लंघन केल्यास सगळी संपत्ती अपवित्र ठरते. याबरोबरच अशा अपवित्र संपत्तीमधून वास्तविक संपन्नता आणि वृद्धी नष्ट पावते. यानुसार 'जकात' या शब्दाची यथार्थता लक्षात येते. अर्थात या शब्दामध्ये 'पावित्र्य' आणि 'दोषरहित' करून वैभवशीलता आणि वृद्धीचा भावार्थ आहे.

इस्लामने जकात अनिवार्य केल्यामुळे काहीजण यास कर समजण्याची घोडचूक करतात. मात्र हा काही कर वगैरे नसून ईश्वरोपासना आहे. हेच कारण आहे की, ज्या देशात इस्लामी राज्य नसते. तेथेसुद्धा मुस्लिम लोक अगदी स्वेच्छेने आणि अत्यानंदाने स्वत:च वर्षभराच्या बचतीचा हिशेब लावून त्यापैकी अडीच टक्के भाग जकातीच्या स्वरुपात दान करतात. खरे पाहता आपल्या घामाच्या आणि कष्टाच्या कमाईने मिळविलेल्या अत्यंत प्रिय संपत्तीतून दान करणे, ही एक कठोर आणि कठीण परीक्षाच आहे. तरीसुद्धा कोणत्याही प्रकारचा करविभाग संवैधानिक नियम, न्यायव्यवस्था, पोलिसयंत्रणा आणि कोणत्याही प्रकारच्या व्यवस्थापकीय प्रशासनाची भीती नसताना, कोणत्याही प्रकारच्या कर बुडविण्याचा दंड वा शिक्षेचे भय नसताना एका अदृष्य असलेल्या अध्यात्मिक प्रेरणेतून हे महान पुण्य असलेले दानकर्म दरवर्षी प्रमाणबद्धरित्या

सुरु असते आणि ही प्रेरणा म्हणजेच ईश्वरोपासनेची दृढ भावना होय. माणसाच्या मनातील ईशप्रेम, ईशभय, ईशपरायणता, ईश्वरासमक्ष उत्तरदायित्वाचा दृढ विश्वास, ईश्वर आणि अंतिम प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या आज्ञापालनाची लालसा, परलोक जीवनात ईश्वरी पुरस्काराची लालसा आणि ईशग्रंथाच्या अर्थात कुरआनाच्या या शिकवणीवर पूर्णपणे असा दृढ विश्वास असणे की, आपल्या संपत्तीतून जकातीची रक्कम दान दिल्याने संपत्ती कमी होत नसून त्यात वृद्धीच होते, ही भावना जकात देण्यास प्रेरित करते.

मानवसमाजाच्या कल्याणात आणि मानवी मूल्यांच्या विकासामध्ये जकात निम्नलिखित स्वरुपाची भूमिका निभावते.

संपत्तीचा अनुचित लोभ नष्ट होऊन, स्वार्थीवृत्तीस मूठमाती मिळून माणसाच्या स्वभावात परोपकाराची भावना निर्माण होते. मायामोहातून माणसास कायमची मुक्ती मिळते. कारण यामुळे मनुष्य चांगले-वाईट न पाहता असंख्य पापकर्मे करीत असतो. वाटेल त्याच्यावर अन्याय-अत्याचार करीत असतो आणि पाप-पुण्याचा मुळीच विचार न करता संपत्तीच्या मागे पिसाटपणे धावत असतो. मग सुरु होते एक अत्यंत भयानक अन्याय व अत्याचाराचे तांडव! समस्त समाजव्यवस्थाच यामुळे क्षतिग्रस्त होते. मात्र जकात दिल्यामुळे या विलक्षण भावनांना मूठमाती मिळते.

संपत्ती ही केवळ समाजातील काही मूठभर श्रीमंताजवळच न राहता बहुसंख्य गरिबांकडे प्रवाहित होऊन आर्थिकरित्या कठोरता नष्ट होऊन संतुलन निर्माण होते.

भांडवलशाही विचारसरणीतून आर्थिक मागासलेल्यांचे शोषण आणि उत्पीडन होण्यावर कायमचा आळा बसतो.

समाजात आर्थिक संघर्ष नष्ट होऊन सद्‌भावना, सहयोग, शुभचिंतन आणि सौहार्दाची भावना समाजात प्रचलित व प्रवाहित होत असते.

मानवजातीची सर्वांत मोठी आणि महत्त्वपूर्ण गरज म्हणजेच सत्यधर्माची सेवा, प्रचार-प्रसार आणि स्थापनेच्या महानतम कामासाठी जकातीमुळे आर्थिक निधीची व्यवस्था होते.

समाजातील वंचित, दुर्बल, विवश आणि निराधार लोकांना, जे काही कारणांमुळे गुलामी अगर वेठबिगारीच्या जुलमी विळख्यात जखडून त्यातून मुक्तीसाठी तडफडत आहेत, मात्र त्यातून मुक्त होण्याचे सामर्थ्य त्यांच्यात नसते, अशांना या जुलमी विळख्यातून कायमची मुक्ती देण्यासाठी कुरआनाने जकातीची रक्कम खर्च करण्याचा आदेश दिला आहे. अर्थातच जकातमुळे गुलाम, दास, वेठबिगारी व कर्जबाजारींना मुक्ती मिळून दारिद्र्याचा शाप समाजातून कायमचा नष्ट होतो.

### ४) हज

इस्लाम हा एक विश्वव्यापी धर्म असून ईश्वरोपासनेच्या इस्लामी पद्धतीतील ही एक विश्वव्यापी अनिवार्य ईशोपासना आहे. मानवी मूल्यांची उन्नती, जागतिक बंधुभाव आणि स्नेह निर्माण करण्यात हजची अध्यात्मिक आणि नैतिक भूमिका अत्यंत महत्त्वपूर्ण आहे. वरवरून केवळ एक तीर्थयात्रेप्रमाणे आणि काही विशेष प्रकारचा धार्मिक विधी वाटणारी हज स्वरुपाची ईशोपासना वस्तुतः मानवतेच्या उत्थानात एक अशी अद्भूत चमत्कारिक बाब आहे, ज्याचे उदाहरण पूर्ण जगात मिळत नाही. एकीकडे यामुळे मानवात अध्यात्मिक शुद्धीकरण होत असून त्यास ईश्वरी आज्ञेचे पालन करण्याचे प्रशिक्षण अत्यंत प्रभावशालीरितीने मिळते. त्याच्यात ईश्वराचे प्रेम चरमसीमेवर पोचते आणि त्याचे ईश्वराशी संबंध दृढ होतात. तर दुसरीकडे ईश्वराची कृपा व प्रसन्नता मिळविण्यासाठी संपत्ती आणि वेळेचा उत्सर्ग, ऐहिक आणि भौतिक भोगविलासी वृत्तीस आळा बसतो आणि मायामोहापासून मुक्ती मिळते. लाभ, लालसा, द्वेश-मत्सर व ईर्ष्यालू भावनांना कायमची मूठमाती मिळते. परिणामस्वरूप एक सामान्य व्यक्ती उच्च मानवी मूल्यांनी अलंकृत होते.

मानवी मूल्यांच्या परिप्रेक्ष्यात अत्यंत महत्त्व असलेल्या बाबींशी सामाजिक आणि सामूहिक व्यवस्थेत हजचे तिसरे योगदान अतिशय महत्त्वपूर्ण आहे. इस्लामची अशी मूळ धारणा आहे की, एकच ईश्वर, एकच सृष्टी अणि या एकाच सृष्टीतील समस्त मानवजातसुद्धा एकच आहे. मात्र राष्ट्र, क्षेत्र, भाषा, वर्ण, वंश, वर्ग, संस्कृती आणि सभ्यतेच्या भौतिक विविधतांना सैद्धान्तिक स्वरुप देऊन मानवास असंख्य तुकड्यांमध्ये विभागण्यात आले. मानवांच्या असंख्य खिपल्या उडविण्यात आल्या, सर्वत्र मानवता दुभंगून गेली, तिचे वर्ण, वंश, भाषा, उच्च-नीच, गरीब-श्रीमंत, आपला-परका आणि वाटेल त्या सिद्धान्ताचे नाव देऊन राजकारणी स्वार्थासाठी मानवतेचे असंख्य तुकडे-तुकडे करण्यात आले. राजकारण, सत्ता आणि सामर्थ्य मिळविण्यासाठी हे पातककर्म आज जगाच्या पाठीवर सर्वत्र थैमान घालत आहे. याच आधारांवर आज माणसांच्या हातूनच माणसांची होळी करण्यात येत आहे, परस्पर तिरस्कार, द्वेष आणि युद्धसदृश परिस्थिती निर्माण करून लोकांच्या रक्ताने स्वार्थ आणि सत्तेच्या क्रूर देवतेस तिलांजली वाहण्यात येत आहे.

अशा या वादळी आणि भयानक विळख्यातून आणि विदारक संकटातून लोकांना मुक्ती देण्यासाठी ज्या गोष्टीची नितांत आवश्यकता आहे, ती म्हणजे उपरोल्लेखित विषमता आणि वैविध्य नष्ट करून समस्त मानवजातीस समता, बंधुत्व, आपुलकी आणि ममत्वाच्या रेशिम बंधनात बांधण्यासाठी त्याचप्रमाणे मानवी मूल्यांनी अलंकृत करण्यासाठी विश्वव्यापी सिद्धान्त असावा. या ऐक्याचे जागतिक स्तरावर प्रदर्शन असावे आणि हीच गोष्ट इस्लामने हज-स्वरुपी ईशोपासनेत प्रदान केली आहे.

हजकरिता जगातील कानाकोपऱ्यातून विविध वर्ण, वंशाचे, विविध भाषा बोलणारे आणि राजा व रयत सर्वच प्रकारचे मुस्लिम लोक गोळा होतात. येथे कोणत्याही प्रकारचा मतभेद आणि मानवातील कृत्रिम फरक नसतो. एकाच प्रकारचे वस्त्र परिधान करून एकाच भाषेत समस्त मुस्लिम एकच परिवार असल्याचे, एकाच ईश्वराची प्रजा अगर रयत असण्याचे दर्शन घडवितात. मानवी सलोखा आणि बंधुत्वाचे हे विश्वव्यापी प्रदर्शन इतर कोणत्याही धर्मात अगर व्यवस्थेत आढळत नाही. अशा प्रकारे हजचा विधी मानवतेकरिता आवश्यक असलेल्या एका अतिशय महान मूल्याची जागतिक स्तरावर स्थापना करण्याची नैसर्गिक प्रयोगशाळा आहे. हे एक असे प्रशिक्षणशिबीर आहे, ज्याच्या अध्यात्मिक वातावरणात माणूस मानवी ऐक्याचे प्रशिक्षण घेऊन मानवांतील वरिष्ठ-कनिष्ठ आणि या आधारावरील विषमतांना मूठमाती देतो. ही एक अशी वास्तविकता आहे, जिची गरज मानवजातीस नेहमीपासूनच भासत आलेली आहे. मात्र सत्तेची लालसा, स्वार्थ आणि भौतिकवादाने पिसाळलेल्या मूठभर धर्मांधांच्या तसेच वर्णवाद, वंशवाद, जातीयवाद, राष्ट्रवाद, भाषांवाद निर्माण करणाऱ्यांच्या हातून मानवता पूर्णत: घायाळ झालेली आहे, आत्मा फाटून त्याची असंख्य लक्तरे झालेली आहेत. अशा या दुभंगलेल्या मानवतेस मात्र केवळ हजरूपी ईशोपासनाच तारू शकते, दुभंगलेली मानवता जोडू शकते, आपसांत प्रेम, बंधुत्व, त्याग आणि जागतिक समता निर्माण करून मानवतेस कायमस्वरुपी शांती प्रदान करू शकते.

## ५) परलोकाची धारणा

एकेश्वरत्वाची धारणा ही मुळात समस्त मानवी मूल्ये आणि हितांची वास्तविक दृढता व स्थायित्वाची आधारशिला असून परलोकाची धारणादेखील याच एकेश्वरत्वाच्या धारणेचा एक भाग होय. एकेश्वरत्वाच्या धारणेमध्ये केवळ आणि केवळ एकाच ईश्वरास उपास्य स्वीकारणे निश्चित असल्यामुळे त्याचे प्रभुत्व आणि स्वामित्वदेखील स्वीकारणे अनिवार्य आहे. शिवाय एकाच ईश्वरास पूज्य मानल्यावर आणि त्याचे स्वामित्व आणि प्रभुत्व स्वीकारल्यावर, स्वत:वर लागू करून घेतल्यावर त्याचे समस्त गुणधर्म आणि समस्त अधिकार स्वीकारणे, त्याच्या क्षमतेवर विश्वास ठेवणेदेखील अनिवार्य आहे.

कुरआनात ईश्वराचे अधिकार स्पष्ट करताना त्याच्या नव्यान्नव गुणधर्मांचासुद्धा उल्लेख करण्यात आला आहे. त्याचे हे गुणधर्म अपार, असीम आणि संपन्न आहेत. याच असीम आणि संपन्न गुणधर्मांपैकी न्यायशील असण्याचासुद्धा एक गुणधर्म आहे. या वर्तमान जगातील मानवी व्यवस्था न्याय आणि अन्यायाचे एक मिश्रण आहे. कारण

मानवसमाजाची जीवनव्यवस्था मानवच चालवितात. मानवांच्या हाती असलेली जीवनव्यवस्था ही दोषपूर्ण व सीमित असते. म्हणून प्रत्येकास वर्तमान जगात न्याय मिळणे अशक्य असते. मग न्याय तर मिळायलाच पाहिजे. ही जणू प्रत्येकाच्या अंत:करणाची नैसर्गिक हाक आहे. एक अशा प्रकारचे न्यायालय असावे, ज्या ठिकाणी दोषपूर्ण आणि पक्षपाती स्वभाव असलेल्या मनुष्याच्या नव्हे तर स्वयं ईश्वराच्या हातीच न्याय देणे असावे. अर्थात ईश्वरच न्यायाधीश असावा.

एक परिपूर्ण न्यायाधीश होण्यासाठी ज्या तत्त्वदर्शिता, ज्ञान व विवेकाची गरज असते, त्यातील खूप मर्यादित अंश या वर्तमान जीवनात मानवास प्राप्त आहे. मात्र ही परिपूर्ण तत्त्वदर्शिता, असीम ज्ञान आणि प्रचंड विवेकसामर्थ्य, अनंत इच्छाशक्ती केवळ ईश्वराकडेच आहे. म्हणून अगदीच त्रुटीरहित, निष्पक्षपणे आणि निर्भयपणे न्यायनिवाडा ईश्वराशिवाय कोणीही करू शकत नाही.

नाश पावणारे हे जीवन आणि त्याची सामाजिक व शासकीय व्यवस्था चालविण्यासाठी माणसाला ईश्वरातर्फे मिळालेले उपरोक्त गुण (अर्थात तत्त्वदर्शिता, निष्पक्षता व सामर्थ्य) मर्यादित स्वरुपाचे आणि अपूर्ण असल्याने सक्रिय आणि प्रभावी असण्याचा प्रश्नच येत नाही. म्हणून पूर्णत: न्याय मिळणे या वर्तमान जगात तरी मुळीच शक्य नाही. म्हणून स्वभावत:च असे प्रत्येकास वाटणे गरजेचे आहे की, या नाशवान जीवनानंतर असे जीवन निश्चितच असावे जे या वर्तमान जीवनाप्रमाणे मर्यादित नसेल, येथील प्रत्येक चांगल्या आणि वाईट कर्मांचा पूर्णत: मोबदला मिळावा, पूर्णपणे न्याय मिळावा आणि कोणावरही अन्याय होता कामा नये. यासाठी मात्र न्यायाधीश हा केवळ ईश्वरच असावा.

जगातील चार प्रमुख धर्मात याच स्वरुपाच्या (अर्थात परलोकी) जीवनाची धारणा वा श्रद्धा आहे. मात्र ही धारणा स्वत:चे विशुद्ध स्वरुप आणि पूर्ण रुपात येनकेन प्रकारे भ्रम, परिवर्तन, संशोधन अगर विकारापासून ज्याप्रमाणे सुरक्षित असावयास हवी, त्याप्रकारे ती केवळ परलोकत्वाच्या स्वरुपात इस्लामच्या मूळ धारणेतच सुरक्षित आहे, आणि ती देखील पूर्ण चौदाशे वर्षांपासून जग अस्तित्वात असेपर्यंत राहणार.

मानवांस त्यांच्या सत्कर्मांसाठी पुरस्कृत करणे आणि दुष्कर्मांसाठी दंडित करणे हे खरे पाहता विशालतर मानवतेची अत्यंत महत्त्वपूर्ण गरज आहे. ही आवश्यकता पूर्णअंशी वर्तमान जीवनात पूर्ण होणे शक्यच नाही. यामुळे मानवी मूल्यांचा ऱ्हास आणि मानवाधिकारांची पायमल्ली होणारच. ही या परिस्थितीचे भोग इतिहासाने तर भोगलेच

शिवाय वर्तमान काळामध्येही याच दुर्दैवी परिस्थितीने समस्त जगातील मानवजातीवर आपला क्रूर विळखा आवळलेला आहे आणि मानवता अत्यंत केविलवाणे अवार्त टाहो फोडीत आहे. कडक कायदा असूनही, कायदा लागू करणाऱ्या बलाढ्य शक्तिशाली व्यवस्था असूनही, सर्वत्र मोठमोठी न्यायालये, तुरुंग असूनही आणि याव्यतिरिक्त शासकीय व गैरशासकीय, राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर मानवाधिकारांचे जाळे पसरलेले असताना मानवी मूल्ये आणि मानवाधिकारांची सर्रास होळी होत आहे. नैतिकतेचे वस्त्रहरण करून नग्न धिंड काढण्यात येत आहे. भ्रष्टाचार, घोटाळे, बलात्कार, रक्तपात, अन्याय, अत्याचार, शोषण वगैरेंचे सर्वत्र भयानक रक्ताळलेले वातावरण आहे. सर्वत्र घोर निराशेचे सावट, घोर अंधकार पसरलेला असून कोठूनही आशेचा किरण दिसत नाही. याचे मूळ कारण असे की या परिस्थितीचे निवारण करण्यासाठी जेवढे प्रयत्न आणि प्रबंध करण्यात आले आहेत, ते आतून नव्हे तर बाहेरून करण्यात आले आहेत. उदाहरणार्थ एखाद्या झाडास खत-पाणी घालण्याऐवजी त्याच्या बुंध्यापासून ते पानाफुलापर्यंत साफसफाई करण्यात येत आहे. खरे पाहता वस्तुस्थिती अशी आहे की, कोणत्याही रोगाचे निवारण आतूनच करणे गरजेचे असते. कारण आतील भागातच एक असे सूक्ष्म आणि अदृश्य जग अस्तित्वात आहे, जे बाहेरील विशाल जगास पूर्ण स्वरुप आणि योग्य दिशा देऊन प्रभावित करते.

परलोकत्वाची इस्लामी अवधारणा माणसाच्या व्यक्तित्वाच्या याच आंतरिक जगामध्ये आधारभूत परिवर्तन व सुधारणा तसेच क्रांती घडवून आणते. ईश्वर हा परम न्यायशील, परमशक्तिमान आणि निष्पक्ष आहे. त्याच्या दरबारी कोणाचीही शिफारस चालत नाही, कोणत्याही प्रकारचे आमिष चालत नाही. न्यायनिवाड्यात तो कोणासही पुरस्कृत आणि दंडित करण्यात सामर्थ्यशाली आहे. त्याचा पुरस्कार (स्वर्ग) आणि दंड (नरक) असीम आहे. अशा या सर्वशक्तिमान ईश्वरासमक्ष हजर राहून आपल्या भल्या-बुऱ्या कर्मांचा जाब देण्याची श्रद्धाच मुळात मानवजीवनाच्या वृक्षास खत-पाणी घालते आणि यामुळेच मानवजीवनरुपी वृक्षास सत्याची फळे लागतात. मानवी मूल्ये आणि मानवाधिकाराच्या फुलांनी वातावरण बहरते. हाच हेतू साध्य करण्यासाठी अर्थात वर्तमानकाळातील दयनीय परिस्थितीतून मानवजातीस मुक्ती देण्यासाठी अगदी मूलभूत माध्यम हे परलोकावर श्रद्धा ठेवणे होय. कारण निर्माता, प्रभू आणि न्यायदाता ईश्वराजवळ मानवजीवनातील प्रत्येक क्षणाची कर्मपत्रिका नोंद होत असते. कुरआनात म्हटले आहे,

"तुमच्यावर देखरेख करणारे (फरिश्ते) नियुक्त करण्यात आलेले असून तुम्ही जे काही करता, त्या सर्वांची ते नोंद करीत असतात."

(कुरआन - ८२ : १०,११,१२)

आपल्या जीवनाच्या कर्मांची नोंदवही परलोकी न्यायदिनाच्या दिवशी पाहून अपराधी म्हणतील की,

"हायरे आमचे दुर्भाग्य! ही कशी कर्मांची नोंद आहे, ज्यामध्ये कोणतीही सूक्ष्म बाबही सुटलेली नाही आणि मोठी बाबही सुटलेली नाही. यात आपल्या जीवनाचे समस्त कर्म नोंदविण्यात आलेले आहे." (कुरआन - १८ : ४९)

याचे स्पष्टीकरण आणखीन एके ठिकाणी अशा शब्दांत करण्यात आले आहे की,

"ज्याने कणभरही पुण्य केले असेल, ते त्यास दिसेल आणि कणभरही पाप केले असेल, तेही दिसेल." (कुरआन - ९९ : ७,८)

ईश्वराने निश्चित केलेल्या नियमांचे उल्लंघन करणाऱ्या अपराध्यांना दंडित करण्यासाठी असलेल्या या असीम यातनांचा कुरआनात ३४५ ठिकाणी उल्लेख आहे. त्याचप्रमाणे ईश्वरी नियमांचे पालन केल्यास मिळणाऱ्या पुरस्काराच्या फळाचा बऱ्याच ठिकाणी उल्लेख करण्यात आला आहे. यावरून हेच सिद्ध होते की माणसाला माणूस बनविण्यासाठी तसेच मनुष्य आणि मानवसमाजाकरिता व समस्त मानवजातीकरिता मानवतेचा मार्ग प्रशस्त करण्यात परलोकवादाच्या इस्लामी मूळ धारणेशिवाय पर्याय नाही. हाच तो मार्ग आहे, जो विशुद्ध, उत्कृष्ट, परिपूर्ण, महान, अतिसक्रिय, प्रभावी, चिरस्थायी योगदान असून यावर जीवनाची वाटचाल केल्यास मानवजातीस अपेक्षित असलेल्या मानवी मूल्ये आणि गुणधर्म तसेच मानवी वैशिष्ट्ये लाभतील.

## ६) प्रेषित्वाची धारणा

एकेश्वरत्व आणि परलोकत्व म्हणजे काय? यांचे स्थान आणि दर्जा तसेच यांची नेमकी व्याख्या काय? या प्रश्नांची उत्तरे मात्र स्वयं ईश्वरानेच स्पष्ट करणे आवश्यक आहे. नसता उपरोक्त दोन्ही बाबी स्पष्ट न होता केवळ दार्शनिक आणि बौद्धिक स्तरावरच सीमित राहतील. म्हणूनच स्वत: ईश्वरानेच याचे एकन् एक अंश, तत्त्व, बारकावे, सूक्ष्मता आणि रहस्य व त्यांच्या मागण्यां स्पष्ट व सर्वज्ञात करावयास हवे, यावर विश्वास ठेवणे, श्रद्धा बाळगणे म्हणजेच ईमानधारण धारण केल्याने प्राप्त होणारे लाभ वा फायदे आणि त्याची अवहेलना केल्यास होणाऱ्या नुकसानांची सर्वसामान्यांना माहिती द्यावी. या दोन्ही मूळ धारणांचा मानवतेला फायदा केवळ एकाच परिस्थित होऊ शकतो. यासाठी एक अशी आदर्श व्यक्ती समाजात असावी, जी या दोन्ही मूळधारणाच्या सिद्धान्त आणि

नियमानुसार आपल्या जीवनाची वाटचाल करीत असावी. या व्यक्तीचे समस्त जीवन याच दोन्ही मूळधारणांच्या सिद्धान्तानुसार असावे. त्याचे आचार-विचार, त्याचे व्यवहार आणि चारित्र्य, त्याची नैतिकता आणि त्याचे प्रत्येक कर्म याच सिद्धान्तावर आधारित असावे आणि समाजाकरिता ही व्यक्ती एक आदर्श जीवन असावी. हेच सिद्धान्त त्याच्या पाप-पुण्याचे आणि चांगल्या-वाईट कर्माचे मापदंड असावे. समाजातील सर्वांत जास्त त्याचेच मानवी व्यक्तित्व स्पष्ट असावे. याबरोबरच त्याच्यात हे वैशिष्ट्यसुद्धा असावे की, तो मर्यादित मानवी बुद्धीविवेक, मर्यादित सामर्थ्य असलेल्या पंचेंद्रियांमार्फत प्राप्त अनुभव आणि व्यक्तिगत भावना व अनुभव तसेच विचार आणि विश्लेषणावर अवलंबून न राहता त्याची संपूर्ण शक्ती व सामर्थ्य ईश्वराच्या देखरेखीत, ईश्वराच्याच आदेश व निर्देशांतर्गत असावे, जेणेकरून त्याच्याहातून नकळतही चूक घडू नये. कारण चूक करणारा माणूस हा कधीही मानवी मूल्यांचे आदर्श वा मापदंड सिद्ध होऊ शकत नाही आणि त्यास समाज आदर्श स्वीकारू शकत नाही. उदाहरणार्थ, एखादा माणूस स्वत: दारू पीत असेल आणि इतरांना दारू सोडण्याची शिकवण देत असेल तर त्याचे ऐकणार कोण? लोकां सांगे ब्रह्मज्ञान व स्वत: मात्र कोरडे पाषाण, अशीच त्याची अवस्था होईल. याकरिता ही बाब अनिवार्य आहे की, स्वत: त्याच्या आणि समस्त मानवजातीचा निर्माता व स्वामी आणि प्रभू असलेल्या ईश्वराकडून मानवी जीवनाशी संबंधित मूलभूत प्रश्नांची उत्तरे, बारकावे आणि गुंतागुंतीच्या अडचणींचे समाधान करण्यासाठी ईश्वरी प्रकाशन प्राप्त असावे. हीच मानवतेची अतिशय महत्त्वपूर्ण आवश्यकता होय.

ईश्वराने मानवजातीची ही आवश्यकता पूर्ण करण्यासाठी मानवांपैकी अशा व्यक्तींची निवड करून आदर्श स्वरुपात प्रेषित्व पदावर त्यांच्या नियुक्ता करण्याची शृंखला आदिकाळापासूनच सुरु ठेवली. (संदर्भ : कुरआन - १३ : ७) आणि प्रेषित्वाच्या याच शृंखलेची अंतिम कडी म्हणजे आदरणीय मुहम्मद (स.) हे होय. (कुरआन - ३३:४०) हे सर्व प्रेषित ईश्वराचे कोणत्याही प्रकारे वाटेकरी नसून ईश्वराचे सच्चे दास व बंदे आहेत; ईश्वराचे परम आज्ञाधारक व प्रतिनिधी, मानवतेचे उद्धारक आणि तात्कालीन समाजाचे आध्यात्मिक व भौतिक नेतृत्व करणारे होय. समस्त मानवजातीवर ईश्वराचे महान उपकार असलेल्या ईश्वरी व्यवस्थेत इस्लामी परिभाषेत नुबूवत म्हणजेच प्रेषित्व असे म्हणतात. अथवा साधारण भाषेत प्रेषितसुद्धा म्हणतात.

प्रेषित्वाच्या याच इस्लामी धारणेनुसार अंतिम प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या सहित इतर सर्वच प्रेषितांवर श्रद्धा ठेवणे अनिवार्य आहे. या अनिवार्यतेचे कारण असेही नाही

की, एखाद्या महापुरुषाशी काहीजणांची आस्थारूपी तहान भागावी आणि या तृप्तीमुळे लोकांना थोडीफार आध्यात्मिक सांत्वना मिळावी. त्याचप्रमाणे ईश्वर आणि प्रेषितांचेसुद्धा यामध्ये कोणतेही हित नाही. कारण ही बाब सर्वांनाच माहीत आहे की, ईश्वर कोणावरही निर्भर नसून त्यास कोणाचीही गरज नाही. कुरआनात याचा विशेष उल्लेख (११२:२) या ठिकाणी करण्यात आला आहे. त्याचप्रमाणे प्रेषित मुहम्मद (स.) यांना काही धर्मविरोधकांनी धनदौलत, संपत्ती, सत्ता, मान-सन्मान आणि प्रतिष्ठा देण्याचे आमिष दाखविले मात्र प्रेषित मुहम्मद (स.) यांनी ठोकारून लावले. सव्वा ते दीड लाखांच्या संख्येत प्रेषितांच्या अगदी इशाऱ्यावर प्राणांची आहुती देण्यास सदा तत्पर असलेले अनुयायी असताना, इस्लामी राष्ट्राचे शासक असतानादेखील प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यासाठी मोठा प्रशस्त प्रासाद अगर भव्य-दिव्य राजमहाल नव्हता तर खजुरींचे छप्पर आणि मातीच्या खुज्या भिंती असलेली एक छोटीशी खोली होती. अगदी साधे जेवण आणि साधे वस्त्र, साधे राहणीमान होते. खजुरींच्या साध्या चटईवरच ते झोपत आणि कधी कधी बऱ्यांच दिवसांपर्यंत या शासकाच्या घरात चूलसुद्धा पेटत नसे. बऱ्याच वेळी केवळ मूठभर खजुरींवर पाणी पिऊनच रात्र काढावी लागत असे. प्रेषितांनी कधीही आपल्या महिमत्वाचा डंका वाजविला नाही, आपला जयजयकार करवून घेतल नाही, मऊ आणि नरम बिछान्यावर कधी झोपले नाही, भव्य-दिव्य सिंहासनावर विराजमान झाले नाही, स्वतः पूज्य आणि उपास्य होऊन रयतेस आपल्यासमोर नतमस्तक व्हायला बाध्य केले नाही. (कारण उपास्य आणि खरा शासक तर केवळ ईश्वरच आहे आणि हीच शिकवण त्यांनी रयतेच्या मनात बिंबविली.)

यावरुन असा एक महत्त्वपूर्ण प्रश्न उठतो की, प्रेषित्वाच्या या धारणेच्या अंतर्गत प्रेषितांवर तात्कालीन समाजास आणि प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर त्यांच्या समकालीन समाजापासून आजपर्यंतच्या लोकांनी श्रद्धा ठेवणे हे ईश्वरातर्फे अनिवार्य का ठरविण्यात आले? एव्हाना आजपर्यंतच्या इतिहासात असे असंख्य महापुरुष येऊन गेले, जे प्रेषित तर नव्हते मात्र महान विचारवंत, चिंतक, अभ्यासक, संशोधक, उपदेशक, विद्वान, समाजसुधारक, वैज्ञानिक, राजनितिज्ञ, अन्वेषक, प्रशासक, शासक, नेता व मार्गदर्शक असण्याचे वैशिष्ट्ये आणि पात्रता वगैरे होती. या प्रश्नाचे सरळ आणि स्पष्ट उत्तर असे की, मनुष्यात उपरोक्त समस्त वैशिष्ट्ये आणि पात्रता असूनदेखील त्यांच्यात एक मोठी कमतरता आणि पोकळी असते, ती केवळ प्रेषितच भरून काढू शकतो. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी तेवीस वर्षांच्या आपल्या प्रेषित्व काळामध्ये (हा काळ अत्यंत कठीण आणि संघर्षमय होता) हीच कमतरता आणि

पोकळी भरून काढली. ही पोकळी कसली व कोणत्या प्रकारची होती? तर ही पोकळी आणि कमतरता म्हणजे मानवास आपलीच वास्तविकता माहीत नसल्याने मानवतेचे ज्ञानच नव्हते, खरी मानवताच माहीत नव्हती, सगळे लोक मानवतेपासून वंचित होते. मनुष्याच्या मनमस्तिष्कामध्ये ईश्वरत्वाची विशुद्ध आणि खरी परिकल्पनाच नव्हती. हेच कारण आहे की, त्यास आपल्या आणि ईश्वरादरम्यान असलेल्या संबंधाची जाणीव मुळी नव्हती. त्याला हेसुद्धा माहीत नव्हते की आपल्याला हे जीवन कशाकरिता मिळालेले आहे? मृत्यूनंतर काय होणार आहे? चांगले कर्म करणारा वा सदाचारी आणि दुष्कर्मी प्रत्येकजण मृत्यू पावताच मातीत मिसळून सारखेच परिणाम भोगेल की दोघांची वेगवेगळी परिणिती होईल? मानवांचे मानवांवर कोणते अधिकार आहेत? कसलाही धार्मिक, राष्ट्रीय, प्रांतीय, जातीय आणि इतर कोणताही भेद न पाळता केवळ मानवतेच्या नैसर्गिक आधारावर सार्वकालीन, सार्वभौमिक, स्थायी व कायमस्वरुपी दर्जाचे कर्तव्य जाणून नेहमी पूर्ण करणे आवश्यक असलेले मानवाधिकार काय आहेत? ही गोष्टच मुळात मनुष्यास माहीत नव्हती. मागे येऊन गेलेल्या प्रेषितांनी सांगितलेले ईश्वराप्रति मनुष्यांचे अधिकार मनुष्य पार विसरून गेला होता. मनुष्यास खरा मनुष्य होण्याकरिता मागील प्रेषितांनी जी कर्तव्ये त्यास सांगितली होती आणि खऱ्या अर्थाने मानवतेचा सेवक व सुधारक, उपकारक, मानवी मूल्यधारक आणि खऱ्या अर्थाने माणूस होण्याकरिता जी कर्तव्ये मागील प्रेषितांकडून मिळाली होती, त्यांचा त्यास पूर्णपणे विसर पडला होता.

हीच कमतरता आणि पोकळी भरून काढण्याकरिता माणसातील वैयक्तिक गुणांबरोबरच ईश्वरी प्रकाशनेची अर्थात दैवी मार्गदर्शनाची नितांत गरज होती. म्हणूनच प्रेषित मुहम्मद (स.) हे एकीकडे सज्जनता, सदाचारिता, सत्यनिष्ठा, सत्यवादीता, सुशीलता, विनम्रता धैर्य, न्यायनिष्ठा, ईशपरायणता, दया, क्षमा आणि उदारता वगैरेसारख्या मानवी गुणधर्मांच्या उच्च शिखरावर विराजमान होते. (संदर्भ : कुरआन - ६८:४) तर दुसरीकडे त्यांच्यावर ईश्वरी प्रकाशनसुद्धा अवतरित होत होते. (संदर्भ : कुरआन - १८:११०) या दोन्ही बाबी चौदाशे वर्षांच्या काळात कोणत्याही इतर व्यक्तीत एकत्रितरित्या आढळत नाहीत. याकरिताच या दोन्ही बाबी प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यामध्ये एकत्रित असल्याने ते प्रत्येक काळ, प्रत्येक प्रांत व प्रदेश, प्रत्येक समाज, प्रत्येक जात आणि प्रत्येक परिस्थितीत एक आदर्श व्यक्ती व मार्गदर्शक होय. या आदर्शापासून विमुख मानवतेचा राजमार्ग प्रशस्त होणे शक्यच नाही. आजच्या धगधगीच्या काळात आणि मानवता पायदळी तुडविण्याच्या या अघोरी काळात हेच सत्य

आपल्यासमोर स्पष्ट होत आहे. या घोर आणि जुलमी परिस्थितीतून मानवजातीस मुक्त करण्यासाठी असंख्य प्रयत्न होत असताना, राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर कडक कायदा असताना आणि सर्वत्र मानवाधिकाराचा उदो-उदो होत असतानासुद्धा यश मिळत नसल्याचे हेच एकमेव कारण आहे आणि ते म्हणजे 'एका आदर्शाची कमतरता!' यासाठीच प्रेषित मुहमम्द (स.) यांना आदर्श मानून त्यांच्या पावलांवर पाऊल ठेवून जीवनाची वाटचाल केल्याखेरीज आज कोणताही पर्याय शिल्लक नाही.

अशाप्रकारे हेच तथ्य समोर येते की, मानवजातीस खऱ्या मानवतेच्या मार्गावर आणण्याकरिता आणि या मार्गावर वाटचाल करण्याकरिता प्रेषित्वाची धारणा स्वीकारणे आणि अंतिम प्रेषित मुहम्मद (स.) यांना आपल्या जीवनाचे आदर्श प्रणेते स्वीकार करणेच नितांत आवश्यक आणि अनिवार्य ठरते.

## इस्लामी धारणांच्या योगदानांचे व्यावहारिक पुरावे

वरील प्रकरणामध्ये इस्लामच्या तीन मूळ धारणा, अनुक्रमे एकेश्वरत्व, परलोकत्व आणि प्रेषित्वत्वाचे मानवसमाजात मानवी मूल्यांच्या स्थापना व उत्थानामध्ये असलेल्या योगदानाचे जे सैद्धान्तिक विवरण देण्यात आलेले आहे, त्यांचे व्यावहारिक रूप पाहिल्याशिवाय त्यांची सार्थकता लक्षात येणे शक्य नाही. म्हणूनच पुढील मजकुरात आपण यावर संक्षिप्त चर्चा करणार आहोत.

### १) इस्लामच्या शुभागमनापूर्वी मानवतेची दशा

तसे पाहता इस्लामचा अर्थात सत्यधर्माचा प्रारंभ जगाची सुरुवात झाल्यापासूनच झाला. मात्र कालांतराने सत्यधर्मावर परिस्थितीचे सावट पसरत गेले आणि वेळोवेळी ईश्वराने हे सावट दूर करण्याकरिता प्रेषितांना पाठविले. याचाच एक भाग म्हणून अंतिम प्रेषित मुहम्मद (स.) यांना ईश्वराने सत्यधर्म अर्थात इस्लामचे परिपूर्ण रूप देऊन पाठविले. मात्र या सत्यधर्माच्या आगमनापूर्वी मानवतेची अवस्था कशी होते हे आपण येथे पाहात आहोत.

१) सर्वत्र अज्ञान आणि अंधश्रद्धेचे घोर काळोख दाटलेले होते.

२) विशुद्ध-एकेश्वरत्वावर मूर्तीपूजा आणि अनेकेश्वरवादाच्या धुळीचे थर साचले होते.

३) मानवतेची वास्तविक परिकल्पना धुमीळ व अस्पष्ट झालेली होती. मानवाधिकार निर्घृणपणे पायदंळी तुडविण्यात येत होते आणि मानवता केविलवाणे टाहो फोडत होती, शोक करीत होती, हुंदके देत होती.

४) समाजात सर्वत्र गुलामगिरीची अमानुष प्रथा प्रचलित होती. प्राण्यांप्रमाणे गुलामांचा बाजार भरत असे आणि मानवांची खरेदी-विक्री होत असे. गुलाम असलेल्या स्त्री व पुरुषांबरोबर क्रूर आणि निष्ठूर व्यवहार करण्यात येत आणि बंदी स्त्रियांचे शोषण करण्यात येत असे.

५) अनाथांवर अन्याय व अत्याचार करण्यात येत असे.

६) माता-पिता स्वेच्छेने आपल्या मुलींची लहानपणीच हत्या करीत वा त्यांना जीवंत गाडीत असत.

७) स्त्री ही केवळ इतर वस्तुप्रमाणेच भोगविलासाचे साधन होती. तिला कसलेही आर्थिक अधिकार प्राप्त नव्हते.

८) दारूचा वापर पाण्यासारखा होत असे. तब्बल दोनशे प्रकारच्या दारूंचा उल्लेख अरब साहित्यात आढळतो.

९) मानवी जीवनाचे महत्त्व शून्य होते. छोट्या-छोट्या कारणावरून आणि किरकोळ भांडणावरून मुडदे पाडण्यात येत असे. एखाद्या कबिल्याच्या उंटाने दुसऱ्या कबिल्याच्या शेतात प्रवेश केल्याच्या क्षुल्लक कारणावरून सूड उगविण्यासाठी शतकानुशतके युद्ध होत असे. असंख्य लोकांचे मुडदे पाडण्यात येत असत.

१०) निर्लज्जपणा, नग्नता व अश्लिलतेने मर्यादा ओलांडल्या होत्या. पवित्र काबागृहाची परिक्रमा करण्यासाठी स्त्री-पुरुष पूर्ण नग्न होत असत.

११) सर्वत्र वाटमारी आणि लूटमार होई आणि व्यापारी कळपावर लोक अक्षरशः तुटून पडत. प्रवास करणे म्हणजे जीव धोक्यात घालण्यासारखे होते.

## आरंभिक तेवीस वर्षांतील सुधार व परिवर्तन

अशा या दयनीय, बिकट व गंभीर परिस्थितीत आपल्या विशुद्ध मूळ धारणांसहित इस्लामचे आगमन झाले. पहिल्या दिवशी व सर्वप्रथम अंतिम प्रेषित मुहम्मद (स.) यांनी केवळ एकमेव ईश्वराची उपासना आणि परलोकी जीवनावर विश्वास ठेवण्याचे आवाहन केले. याच एकेश्वरवादाच्या सूत्रावर आधारित मानवतेच्या उद्धाराचे आंदोलन तेवीस वर्षांत पूर्ण झाले तेव्हा माणसात पूर्णपणे सुधार आणि परिवर्तन आलेले होते. समाजाची कायाच पालटून गेली होती. आध्यात्मिक आणि नैतिक रुपरेखा पूर्णतः लकाकत होती. सामाजिक, आर्थिक व राजनैतिक व्यवस्थेत क्रांती घडली होती. या सर्वव्यापक परिवर्तन आणि क्रांतीचे श्रेय इस्लामच्या मूळ धारणांवरच जाते. याची काही उदाहरणे आपण या ठिकाणी पाहू या.

१) अज्ञान आणि अंधश्रद्धेचे दाट अंधार सत्यज्ञानाच्या प्रकाशामुळे पूर्ण नष्ट झाले आणि मनुष्याला आपल्या अस्तित्वाची वास्तविकता व यथार्थतेचे ज्ञान प्राप्त झाले.

ईश्वराची खरी ओळख आणि मनुष्य व ईश्वरादरम्यान असलेल्या संबंधाची मनुष्यास ओळख झाली. सृष्टी आणि ब्रह्मांडाची वास्तविकता, मानवाच्या सृजन व उत्पत्तीचा मूळ उद्देश, या नाशवान व क्षणभंगूर जीवनानंतरच्या चिरस्थायी जीवनाचे अंतिम लक्ष्य, पाप-पुण्य, सदाचार-दुराचार, योग्य-अयोग्य, नफा-तोटा वगैरेच्या वास्तविक व्याख्येचे ज्ञान माणसाला झाले.

२) मिथ्या, आडंबर, अंधश्रद्धा, अनेकेश्वरवाद, मूर्तीपूजा आणि यासारख्या ना-ना बाबींत बरबटलेल्या माणसास सत्य, यथार्थ, बौद्धिकता, विवेक, विश्वास आणि ज्ञानाची अपार व बहुमूल्य संपत्ती मिळाली.

३) विखुरलेला समाज एकत्र झाला. शत्रुता आणि परस्पर वैरभावाचे मैत्री, स्नेह व बंधूभावात परिवर्तन झाले. स्वार्थाचा समूळ नायनाट होऊन परोपकाराने याची जागा घेतली. उच्च-नीच, श्रेष्ठ-कनिष्ठ वगैरेसारखे भेदभाव नष्ट होऊन समता व बंधुत्व निर्माण झाले. काळा-गोरा, अरब-अरबेतर आणि यासारख्या इतर सर्वच मापदंड व आधारांवर निर्माण झालेले श्रेष्ठत्व आणि कनिष्ठत्व नष्ट होऊन ईशपरायणता आणि ईशभय तसेच सदाचार आणि सत्यनिष्ठेच्या मूळ आणि कायमस्वरुपी मापदंडावर मानवतेत श्रेष्ठ व कनिष्ठ असे वर्गीकरण झाले.

३) प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या शिकवणी आणि आदेशानुसार कालपर्यंत पायाखाली तुडविल्या जाणाऱ्या गुलामांना हृदयाशी कवटाळून बंधु ठरविण्यात आले. त्यांच्याशी स्नेह आणि बंधुभावाचा व्यवहार करण्यात येऊ लागले. आपण जे खातो आणि जे वापरतो तेच त्यांना देण्यात येऊ लागले. त्यांच्याशी प्रेम, सद्भावना आणि परोपकाराचा व्यवहार करण्यात येऊ लागला. त्यांच्यावर अन्याय व अत्याचार करणे व त्यांच्या सामर्थ्य आणि ऐपतीपेक्षा जास्त काम करवून घेणे हे ईश्वराच्या प्रकोपाचे कारण घोषित करण्यात आले. त्यांना स्वतंत्र केल्यास स्वर्गप्राप्तीची शुभसूचना देण्यात आली. मस्जिदीमध्ये सर्वांनीच एकत्रित येऊन आणि खांद्यास खांदा लावून नमाज अदा करण्याच्या प्रक्रियेद्वारे प्रतिकात्मक रुपाने सामाजिक स्तरावर गुलामांना बरोबरी व समानतेचा दर्जा मिळाला. एवढेच नव्हे तर स्वत: प्रेषित मुहम्मद (स.) यांनी एका गुलामास दत्तक घेऊन या पुण्यकर्माची सुरुवात केली. आपल्या आत्याबहिणीशी त्याचे लग्न केले आणि त्याच्या मुलास एका लष्करी मोहिमेचा सर्वोच्च सेनापती करून पाठविले. या लष्करामध्ये उच्चकुलीन लोक त्याच्या अधीन होते. हळू हळू गुलामीची प्रथा नावापुरती बाकी राहिली. इतिहासात पुढे चालून गुलाम कुळातील बरेचजन इस्लामी राष्ट्राचे संस्थापक आणि शासक झाले.

३) रात्रंदिवस तोंडाला दारुचे पेले लावणारे आणि दारूचे माठच्या माठ फस्त करणारे लोग दारुविषयी तिरस्कार करू लागले. दारू पिणे तर सोडा, दारूचा एक थेंबही जिभेवर घेणे त्यांच्यासाठी अशक्य झाले. यामुळे दारू पिल्यामुळे निर्माण होणारे नैतिक दोष आणि चारित्र्यिक विकार आपोआपच नष्ट झाले.

४) स्त्रीला गौरवपूर्ण स्थान मिळाले. तिच्या शीलत्व आणि सतीत्वाचे पूर्णतः रक्षण होऊ लागले. मानव या नात्याने तिला पुरुषासमान अधिकार व दर्जा मिळाला. पूर्वी कल्पनासुद्धा नसलेले बरेच अधिकार तिला मिळाले. पिता, पती, माता, संतती आणि आणखीन काही ठराविक नातलगांकडून मरणोपरांत धन, संपत्तीमध्ये कायदेशीर वाटा प्राप्त करण्याचा अधिकार मिळाला. लग्नासाठी स्वतः निर्णय घेण्याचा अधिकार मिळाला. संपत्ती राखणे, तिचा स्वतः वापर करणे आणि याबरोबरच आपल्या संपत्तीचे मालक होण्याचा अधिकार मिळाला. शिक्षण घेण्याचा आणि भूमिका व मत व्यक्त करण्याचा अधिकार मिळाला. पुढे चालून इतिहासामध्ये मोठमोठ्या विद्वान आणि कायदेतज्ज्ञ स्त्रिया इस्लामी समाजात पुढे आल्या.

५) अनाथ, दुर्बल, विधवा, वृद्ध, आजारी, कैदी, पराभूतजन आणि आकस्मात समस्याग्रस्तांची तात्काळ सेवा आणि मदत करण्याची प्रथा समाजात प्रचलित झाली.

६) अश्लीलता, निर्लज्जता, अभद्रता आणि नग्नतची प्रथा नष्ट झाली. यामुळे अनैतिकताही नष्ट झाली.

७) प्रेषित मुहम्मद (स.) यांनी मानवजातीस शिकवण दिली की, कोणीही मुलगा-मुलगीत भेदभाव करता कामा नये. मुलीच्या शिक्षण-प्रशिक्षणाची आणि पालन-पोषणाची जी व्यक्ती उत्तम व्यवस्था करील, तिचा चांगल्या व योग्य ठिकाणी विवाह करून देईल ती व्यक्ती स्वर्गामध्ये माझ्या अगदी जवळ असेल. प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या या शिकवणीमुळे समाजावर इतका जबरदस्त प्रभाव पडला की, मुलीच्या जन्मावर चेहऱ्यावर अपमान आणि भीतीचे सावट पसरणाऱ्या लोकांच्या चेहऱ्यांवर आनंद ओसंडून वाहू लागला. मुलींना जीवंत गाडणारा समाज मुलींच्या रक्षणासाठी प्राणाची आहुती देण्यासाठी कंबर कसू लागला. तिचे स्नेहपूर्ण व आनंदाने पालनपोषण करू लागला.

८) लोकांच्या मनात ईशपरायणता, न्यायनिष्ठा आणि सत्यनिष्ठा निर्माण झाली. अन्याय व अपराधांचा आलेख शून्यावर येऊन ठेपला. यदाकदाचित एखाद्या व्यक्तीकडून अपराध घडलाच तर कोणताही पक्षपात न होता इस्लामी कायद्यानुसार इतकी कडक शिक्षा लागू होत असे की, अगदी कल्पनेनेच लोकांच्या मनांचा थरकाप उडत असे आणि कोणीही अपराध करण्यासाठी धजावत नसे व याची गरजही पडत नसे.

एकदा एका अत्यंत प्रतिष्ठित घराण्यातील महिलेने चोरी केली. लोकांनी अंतिम प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याकडे शिफारस केली की ही महिला खूप प्रतिष्ठित कुळातली आहे. म्हणून अपराधाची ठराविक शिक्षा तिला देऊ नये. नसता समाजात बदनामी होईल. यावर न्यायनिष्ठ प्रेषित मुहम्मद (स.) क्रोधित झाले. म्हणाले, प्रतिष्ठित व अप्रतिष्ठित आणि उच्च-नीचच्या आधारांवर कायदा लागू करण्यात पक्षपात केल्यामुळेच मागील बरेच लोक अगर जनसमुदाय ईश्वराच्या कोपास बळी पडून नष्ट झाले. एव्हाना माझी लाडकी लेक फातिमाने (रज़ी.) जरी चोरी केली असती तर तिलादेखील मी इस्लामने निश्चित करून दिलेली शिक्षा दिली असती. मग त्या चोर महिलेस पूर्ण शिक्षा देण्यात आली. पापकर्म आणि अपराधांविषयी जनतेच्या मनात तीव्र तिरस्कार निर्माण झाला. चुकून जर एखाद्याच्या हातून अपराध घडलाच तर स्वतःहूनच अपराधी न्यायालयात येऊन गुन्हा कबूल केल्याची आणि अपराधाची शिक्षा भोगण्याची घटनासुद्धा इस्लामी इतिहासाव्यतिरिक्त इतर कोठेही सापडत नाही.

९) समस्त अरब प्रदेशात शांती, सुरक्षा आणि समाधानाचे वातावरण निर्माण झाले. एकटीच स्त्री हातात बहुमूल्य सोने घेऊन एका नगरीपासून दुसऱ्या नगरीपर्यंत प्रवास करीत असे आणि तिला चोरी-वाटमारीची मुळीच भीती नसे. तिचे प्राण, सोने आणि शील सुरक्षित असे.

१०) मानवाधिकारांची नवीन रुपरेखा तयार झाली. प्रत्येक प्रकारचे अधिकार पूर्ण करणे निश्चित आणि शाश्वत ठरले. अधिकारक्षेत्र विस्तारण्यात येऊन अधिकारासह कर्तव्याची जोड देण्यात आली. लहान-मोठ्या प्रत्येक व्यक्तीत उत्तरदायित्व आणि अनुशासनाची तसेच शिस्तीची भावना प्रबळ झाली.

११) आंतरराष्ट्रीय प्रकरणे, समझोते आणि युद्धनियमांचा नवीन व मजबूत पाया रोवण्यात आला, जो ईश्वराच्या आदेशानुसार न्याय, सत्य, मानवी मूल्ये व मानवाधिकारांवर आधारित होता.

## अंतिम प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या नंतर

अंतिम प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या नंतर तीस वर्षांपर्यंत खिलाफतचा काळ होता. या काळामध्ये मोठमोठे भूक्षेत्र आणि मोठमोठ्या मानवी इस्लामच्या मूळ धारणांनी प्रभावित आणि लाभान्वित झाल्या. सामान्य जनतेच्या माना शक्तिशाली आणि जुलमी गुलामगिरीच्या विळख्यातून स्वतंत्र झाल्या. लोक एकाच ईश्वराच्या गुलामगिरीशिवाय इतर प्रत्येक प्रकारच्या गुलामगिरीतून मुक्त झाले. शासक हा जनतेचा सेवक आणि

समाजसुधारक झाला. मानवाधिकार आणि न्यायाच्या दृष्टीत तो एका सामान्य नागरिकाप्रमाणेच झाला. शासन करणे म्हणजे त्याच्या दृष्टीत ईश्वराकडून सोपविण्यात आलेला ईश्वरी ठेवाच आणि त्याचे रक्षण करणे, हे राजनैतिक कर्तव्यच नसून ईश्वरासमक्ष उत्तरदायित्व अगर जवाबदारीच्या भावनेने परिपूर्ण ईश्वरोपासनेचे रूप समजले जाऊ लागले. याच आध्यात्मिक व नैतिक शक्तीमुळे इस्लामी राष्ट्र इतके शक्तिशाली झाले की, या राष्ट्राच्या साध्या कल्पनेनेच पर्शिया (तात्कालीन महासत्ता) व रोम (महासत्ता) थरथर कापता असे. दुसरीकडे याच इस्लामी राष्ट्राचे द्वितीय खलीफा माननीय उमर (रज़ी.) यांच्या विनम्रतेची व दयाभावाची अशी अवस्था होती की, शासनप्रणालीच्या इतिहासात अशा अद्‌भूत चारित्र्याचे उदाहरण मिळणेही शक्य नाही. मानवी मूल्यांच्या अतिउंच स्थानावर विराजमान असलेल्या त्यांच्या चारित्र्यांची काही रुपे, जी इस्लामच्या मूळ धारणांच्या योगदानामुळेच होती, ती आपण पुढे पाहू या.

१) महान आणि प्रचंड शक्तिशाली असलेल्या इस्लामी राष्ट्राचे वैभवशाली शासक एकदा जनसभेस भाषण देण्याकरिता उभे राहताच एक सामान्य म्हातारी म्हणाली,

"तुमचे भाषण बंद करा! ते आम्ही नंतर ऐकू. अगोदर हे सांगा की, सरकारी निधीतून जे वस्त्र सर्वांना वाटण्यात आले, ते आकाराने इतके मोठे नव्हते की त्यातून इतका लांबलचक सदरा (जो तुमच्या अंगावर आहे) कसा तयार झाला? अर्थातच हे अतिरिक्त कापड तुमच्याकडे कसे काय आणि कोठून आले?" या ठिकाणी ही गोष्ट मुळीच विसरता कामा नये की, आजपासून दीड हजार वर्षांपूर्वी सर्वत्र बादशाहीचा, राजेशाहीचा आणि फक्त हुकुमशाहीचाच काळ होता. सर्वत्र केवळ हम करे सो कायदा होता. वर्तमान काळातील लोकशाहीची कल्पनासुद्धा करणे त्याकाळी शक्य नव्हते. इतक्या बलाढ्य शासकासमोर 'ब्र' काढण्याचे धारिष्ट्य कोण करणार? शासकासमोर प्रजेला बोलण्याचे स्वातंत्र्य अस्तित्वातसुद्धा नव्हते. अशाप्रकारचे मतस्वातंत्र्य अगर टीका करण्याचे स्वातंत्र्य इतिहासात प्रथमच इस्लामने मिळवून दिले आणि तेही चौदाशे वर्षांपूर्वी. म्हातारीचे शब्द ऐकताच माननीय उमर (रज़ी.) जागीच थबकले, आपले भाषण गुंडाळले आणि आपल्या सुपुत्रास बोलावून म्हटले,

"माझ्या या मुलाच्या वाट्याला आलेले हे वस्त्र आणि माझ्या स्वत:च्या वाट्याला आलेले वस्त्र मिळून मी हा लांबलचक सदरा शिवला." यासाठी त्यांनी भर जनसभेत आपल्या सुपुत्राची साक्ष नोंदविली.

२) इस्लामी राज्याच्या शासकपदी नियुक्ती झाल्यावर माननीय उमर (रज़ी.) यांनी जनसभेस संबोधित करताना परीक्षार्थ विचारले,

"तुम्ही आज मला शासकपदी नियुक्त केले आहे. उद्या जर मी वाकडा झालो (कर्तव्याशी कुचराई केली) तर तुम्ही काय कराल?"

यावर एका साधारण व्यक्तीने आपली तलवार म्यानातून बाहेर काढताना म्हटले, "हे उमर (रज़ी.) आम्ही या तलवारीच्या बळावर तुम्हाला सरळ करू!"

त्या व्यक्तीचे शब्द ऐकताच माननीय उमर (रज़ी.) अत्यानंदित झाले आणि आकाशाकडे चेहरा करून म्हणाले,

"हे महान ईश्वरा! तुझे आभार मानावे तितके कमीच आहे. कारण आज रयतेमध्ये इतके सत्यनिष्ठ लोक आहेत की त्यांच्यादरम्यान मला शासनकर्तव्य सांभाळण्याचे सौभाग्य लाभलेले आहे!"

३) एकदा रात्रीच्या वेळी माननीय उमर (रज़ी.) वेष बदलून शहराच्या गल्ली बोळात फेरफटका मारून जनतेच्या खुशालीची खबर घेत होते; राज्यव्यवस्थेची कार्यशीलता किती प्रमाणात आहे, याचा अनुमान लावत होते. एका घरातून मायलेकीची कुजुबज त्यांना ऐकू आली. आई आपल्या लेकीला सांगत होती, बाळे! दुधात थोडेसे पाणी टाक, "अगं आई! खलीफाचा आदेश आहे की, दुधात पाणी टाकू नये!" मुलीचे उत्तर, "अगं इतक्या रात्रीच्या वेळी खलीफा कुठे येऊन पाहायला लागलाय!" आई म्हणाली, "अगं आई! खलीफाने (शासकाने) पाहिले नाही तर काय झाले. ईश्वर तर पाहतोय ना!" मुलीने आपल्या आईस दिलेले उत्तर खलीफा माननीय उमर (रज़ी.) यांच्या कानी पडताच त्यांना अत्यानंद झाला. त्यांनी आपल्या मुलाबरोबर या मुलीचे लग्न केले.

अशा उच्च नैतिकता आणि पारदर्शक चारित्र्याची असंख्य उदाहरणे इस्लामशिवाय इतर ठिकाणी क्वचितच सापडतात अशा चारित्र्याच्या निर्मितीमध्ये इस्लामच्या मूळ धारणांची भूमिका स्पष्ट रूपाने लक्षात आल्याशिवाय राहात नाही.

## इस्लामी शासन काळानंतर आजपर्यंत

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी इस्लामी मूळ धारणांवर आधारित सिद्धान्त आणि नियमांवर ज्या अत्युच्च चारित्र्याच्या व्यक्ती आणि उत्कृष्ट समाजाची रचना केली होती. ३० वर्षीय इस्लामी शासनकाळामध्ये याची एक हलकी झलक वरील मजकुरात दाखविण्यात आलेली आहे. याव्यतिरिक्त इस्लामी शासन नसलेल्या ठिकाणीसुद्धा मुस्लिम समाजाने सत्य, न्याय आणि मानवाधिकारांची कास कधीही सोडलेली नाही. याची असंख्य उदाहरणे आणि पाठपुरावे केवळ मुस्लिमांनी नव्हे तर मुस्लिमेतर विद्वानांनीसुद्धा दिले आहेत.

## एक विचारपूर्ण दृष्टी

इस्लामी समाजाची जी रूपरेखा आपण पाहिली आहे त्यात हे सहजपणे दिसते की, जीवनाच्या कणाकणात या धारणा पाहायला मिळतात. अर्थात प्रत्येक कार्य अगर सर्व व्यवहार या धारणांनी प्रभावीत झालेले आढळतात. माणसाने स्वत: आपल्या डोळ्यांनी कधी ईश्वराला पाहिलेले नाही. मात्र इस्लामने ज्या समाजाची निर्मिती केली आणि ऐतिहासिक विश्वविक्रम केला, त्यावर विचार केल्यास ही बाब निश्चितच स्पष्ट होते की, कधीही आणि कोणीही न पाहिलेला ईश्वर त्यांच्या समोर जणू साक्षात प्रकटला. त्यांच्यापैकी कोणीही हे पाहिलेले नाही की उद्या काय होणार? मात्र कयामतच्या अर्थात पारलौकिक न्याय-निवाड्यावर त्यांचा इतका प्रबळ विश्वास होता की, जणू ते अंतिम निवाड्याच्या दिवशीच ईश्वरासमोर जाब देण्याकरिता उभे आहेत. खरी गोष्ट अशी की, इस्लामव्यतिरिक्त इतर कोणत्याही जीवन-सिद्धान्तावर आधारित अशा उच्चकोटीच्या समाजाची उभारणी शक्यच नाही.

प्रत्येक सच्चा मुस्लिम अगर इस्लामी समाजाचा प्रत्येक सदस्य आपल्या एकन् एक कर्मासाठी स्वत:ला ईश्वरासमोर उत्तरदायी असण्याची प्रबळ श्रद्धा बाळगतो. त्याचा या गोष्टीवर पूर्ण विश्वास असतो की, त्याने जर एखादे पाप केले अथवा अपराध केला तर या वर्तमान जगात गुन्ह्याची शिक्षा मिळाली नसली तरी परलोकात मात्र ईशदंड अवश्य मिळेल. त्याचा हाच विश्वास त्याला त्याचे समस्त जीवनच प्रभु ईश्वराच्या अधीन करण्यासाठी आणि आपले पूर्ण जीवन ईश्वरास समर्पित करण्यास बाध्य करतो. त्याचप्रमाणे त्याच्या विश्वासानुसार कार्य करण्याचे दोन प्रकारसुद्धा मुळीच नाहीत की, काही कार्य ईश्वराच्या आज्ञेच्या स्वाधीन असावेत आणि काही कार्य आपल्या मर्जीनुसार असावेत. त्याचे संपूर्ण जीवन आणि समस्त इच्छा-आकांक्षादेखील ईश्वराच्याच मर्जीच्या स्वाधीन असावे, अशीच एका मुस्लिम व्यक्तीची गाढ श्रद्धा असते. म्हणूनच तो आपल्या जीवनाची वाटचाल करताना प्रत्येक क्षणी आणि प्रत्येक पावली ईश्वरी प्रसन्नता व अप्रसन्नता आणि ईश्वरी मर्जी व इच्छेचा पूर्ण विचार करतो. पूर्ण इस्लामी समाजाचीच जीवनव्यवस्था आणि कार्यनीती अशीच असते. कारण अशाच व्यक्तींनी उत्तम व सत्यनिष्ठ समाजाची स्थापना होत असते. जनतेसमोरसुद्धा ईश्वराच्या आदेशांच्या पालनाचे महान उद्दिष्ट तर असतेच शिवाय शासक, अधिकारी आणि पुढारीसुद्धा ईश्वरी आदेशांचेच पालन करण्याचा महान हेतू समोर ठेवतात. एवढेच नव्हे तर शासक आणि अधिकारीवर्गासमोर तर ईश्वरासमोर

समाजाप्रति उत्तरदायित्वाची जाणीव ही कितीतरी पटीने जास्तच असते. मग अशा प्रकारचा सूज्ञ समाज अन्यायी, अत्याचारी असणे तर सोडाच, अनाचारीदेखील असू शकत नाही. तर याउलट तो अन्याय, अत्याचार आणि असत्याचा जगातून समूळ नायनाट करणाराच असणार. जगाच्या पाठीवर सर्वत्र माजलेली पशूता तसेच अशांती आणि उपद्रवाचा समूळ नायनाट केवळ असाच समाज करू शकतो. असाच समाज मानवतेच्या राजमार्गाचे खऱ्या अर्थाने विश्वव्यापी नेतृत्व करू शकतो.

इस्लामी धारणांच्या आधारावर समाज स्थापित करण्यासाठी विधी अगर कायदा आणि कर्म निश्चित करून देण्यात आलेले आहे. यानुसार ज्या ज्या वेळी कार्य करण्यात आले, त्या वेळी या धारणांचे स्वरुप प्रकट झाले. आजही त्यानुसार कार्य केल्यास निश्चितच क्रांती घडू शकते.

इस्लामी धारणांतील वैशिष्ट्यांचे प्रमाण व पुरावे बाहेरून आणण्याची मुळीच गरज नाही. ही वैशिष्ट्ये स्वत: या धारणांतच असल्याचे ठळकपणे स्पष्ट होते. एखाद्यास बाहेरील पुरावे हवेच असतील तर आजपर्यंतचा इतिहास आणि वर्तमानसुद्धा साक्षी आहे.

इस्लामी धारणा, नियम व शिकवणी या केवळ मुस्लिमांसाठी नसून समस्त मानवजातीकरिता आहेत, समस्त मानवजातीची हक्काची संपत्ती आहे. मुस्लिम आणि मुस्लिमेतरांमध्ये फरक केवळ इतकाच आहे की मुस्लिम या धारणांवर श्रद्धा ठेवतात. मात्र याचा अर्थ असा मुळीच नाही की या धारणा मुस्लिमांची अशी स्वयंसंपत्ती आहे, जिच्यावर इतरांचा मुळी अधिकारच नाही. समस्त मानवजातीचे हे कर्तव्य आहे की, या धारणांच्या महत्त्व आणि उपयोगितांवर गंभीरपणे विचार करावा. जीवनाच्या इतर नियम, धारणा आणि सिद्धान्त इस्लामी धारणा वा सिद्धान्तांशी तुलना करुन पाहावे आणि ज्या धारणा अधिक पवित्र, मानवतापूर्ण व कल्याणकारी आहेत, त्या अवश्य स्वीकाराव्या. एखाद्या मूल्यवान आणि उपयोगी असलेल्या वस्तुला, जिच्यावर इतरांबरोबर आपलासुद्धा पूर्ण अधिकार आहे, ती केवळ एवढ्यासाठीच ठोकारून देणे की, ती वस्तु दुसऱ्याजवळ आहे, हे काही विवेक आणि बुद्धिमत्तेचे लक्षण ठरणार नाही. उदाहरणार्थ, एखाद्याची वडिलोपार्जित संपत्ती असून ती समजा सर्व भांवडांपैकी एकाच भावाजवळ आहे. तर अशा परिस्थितीत कोणताही भाऊ त्या संपत्तीवरील मालकी अधिकार केवळ एवढ्या कारणास्तवच सोडून देईल काय की, ती संपत्ती दुसऱ्या भावाच्या ताब्यात आहे? तर मुळीच नाही! इतर भावंडे ती संपत्ती प्राप्त करण्याचा प्रयत्न करणार नाही काय? तर निश्चितच करतील.

## एक ईश्वर! एक मानव!! एक विधान!!!

हे एक निर्विवाद आणि सर्वस्वीकृत सत्य आहे की ईश्वर एकच असून समस्त विश्वाचा निर्माता, कर्ता, प्रभू व पालनकर्ता आहे. त्यानेच समस्त मानवांना निर्माण केले आणि याच आधारावर सृष्टीतील समस्त मानव समान आहेत. इस्लाम याच प्राकृतिक सत्याचा प्रवर्तक, उपदेशक आणि समर्थक असून मानवजीवनाच्या प्रारंभापासूनच या सत्य-सिद्धान्तानुसार मानवतेची शिकवण देत आला आहे.

मानवाने धर्माच्या आणि स्वयंरचित विधानाच्या नावावर मानवतेचे विभाजन करून अनेक तुकडे आणि तुकड्याचे तुकडे करून टाकले. अनेक श्रेणी आणि असंख्य वर्गात मानवतेचे विभाजन केले. प्रथम देश आणि जाती-पातीच्या नावावर तुकडे-तुकडे केले. आपल्या देशाला पवित्र ठरवून इतर देशांना अपवित्र ठरविले, आपली जात पवित्र आणि इतरांची जात (?) अपवित्र ठरविली. आपली जात सभ्य, सुसंस्कृत आणि श्रेष्ठ (?) ठरवून जगातील इतर जाती असभ्य, दस्यू आणि म्लेक्ष ठरविली. एवढ्यावरसुद्धा समाधान झाले नाही तर त्याने विभाजनाची जी (कुटिल) नीती आपल्या आणि इतर जातीच्या दरम्यान केली होती, ती स्वत: आपल्याच जातीत करून आपल्याच जातीचे आणखीनही तुकडे केले. एका छोट्याशा आणि मूठभर वर्गाने विद्या, ज्ञान आणि धर्माचे सिंहासन बळकावले तर इतर एका वर्गाच्या हाती धर्मरक्षणाच्या नावाखाली आपल्या पूर्ण रक्षणाची जवाबदारी सोपवून मोकळा झाला. मात्र दुर्दैव एवढ्यावरसुद्धा संपले नव्हते. आणखीन एक छोटा वर्ग जीवनावश्यक साधनसामुग्री पुरविण्यासाठी निर्माण करण्यात आला आणि राहिलेला मोठा जनसमूह बिचारा आपल्या मानगुटीत अत्यंत दुर्दैवी दासत्वाचे साखळदंड अडकवून अन्याय व अत्याचाराने भोग भोगू लागला. मानवजातीची ही दुर्दशा थांबण्याचे नाव घेत नव्हती. यापैकी आणखीन एक वर्ग चांडाळ आणि अस्पृश्याचे नाव देऊन निर्माण करून कुत्री-मांजरी आणि डुकरापेक्षाही खालच्या दर्जावर त्यास लेखण्यात आले. कुत्री मांजरींना आणि डुकरांना गावाच्या वेशीच्या आतमध्ये आणि रस्त्यावरसुद्धा चालण्या-फिरण्याची मुभा होती. मात्र चांडाळ आणि अस्पृश्यांना याची परवानगी नव्हती. कुत्र्यांच्या स्पर्शामुळे कोणीही अपवित्र होत नसे मात्र अस्पृश्यांच्या सावलीच्या स्पर्शानेसुद्धा आणि त्याच्यावर दृष्टी पडली असतानासुद्धा मनुष्य अपवित्र होत असे. अस्पृश्य आणि चांडाळाचे शरीर व शरीराबरोबर त्याची सावलीसुद्धा अस्पृश्य आणि अपवित्र ठरविण्यात आलेली होती. हा भेदभाव केवळ सामाजिक नियम आणि खान-पान व विवाह-संस्कारापुरताच मर्यादित नव्हता. तर आणखीनही अन्यायपूर्ण गोष्ट अशी की, धर्मसुद्धा याच भेदभावांतर्गत येत असे. अपवित्र

आणि अस्पृश्य वर्गाला धार्मिक ग्रंथ वाचण्याचा अधिकार नव्हता, त्यानुसार पूजापाठ करण्याचा अधिकार नव्हता. देवळांत, मंदिरात प्रवेश करणे तर सोडाच अगदी स्पर्श करण्याचाही अधिकार नव्हता. या अस्पृश्य वर्गाचे आराध्यदैवत उच्चवर्णीय वर्गाच्या देवी-देवता नसून केवळ भूतप्रेतच होते. अस्पृश्यांना उच्चवर्णीयांच्या देवी-देवतांना पूजण्याचे स्वातंत्र्यच नव्हते. त्यांनी फक्त भूत-प्रेतांनाच पुजावे असा धर्म होता. नासिकच्या काळाराम मंदिरात प्रवेशाचा इतिहास आजही साक्षी आहे. या अस्पृश्य वर्गाची शुद्धी, सुधारणा आणि उन्नतीचे धर्मात कोणतेही विधान नव्हते.

मानवतेची ही दुर्दैवी आणि शोचनीय अवस्था केवळ एकाच देशात नव्हती, तर जगाच्या पाठीवरील सर्वच देशांमध्ये व जातींमध्ये ही परंपरा प्रचलित होती. याकरिता इतिहास साक्षी आहे. साऱ्या जगाचे नेतृत्व करणाऱ्या आणि सभ्यता व संस्कृतीच्या बढाया मारणाऱ्या अमेरिकेसारख्या विकसित देशामध्ये काळा-गोरा संघर्ष अजूनही सुरुच आहे. तेथील शासनाने हा संघर्ष मिटविण्यासाठी भरपूर प्रयत्न केले, मात्र अद्यापही त्यास यश मिळाले नाही. ग्रेटब्रिटन आणि यूरोपसारख्या आधुनिक व उदार मतवादी देशांतसुद्धा दोन समाजांसाठी दोन वेगवेगळे चर्च आहेत. अर्थात उच्चवर्गासाठी वेगळे आणि कनिष्ठवर्गासाठी वेगळे. अशा भेदभावाच्या अमानवी परिस्थितीसाठी आपला प्रिय भारतदेशसुद्धा मुळीच अपवाद नाही. जगाच्या पाठीवरील प्राचीन संस्कृती आणि धार्मिक सभ्यतेचे केंद्र असलेला आपला भारत देश जर या बाबतीत मागे राहिला असेल तर नवलच. गांधीजींनी या भेदभावाविरुद्ध आवाज उठविला आणि अस्पृश्यांच्या उद्धाराचे आंदोलन चालविले. शिवाय भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची कामगिरी साऱ्या जगाला माहीत आहे. वर्तमान विधान हे स्पृश्यास्पृश्यतेविरोधी असले तरी व्यावहारिक रुपाने स्पृश्यास्पृश्यता अद्यापही संपलेली नाही.

इस्लामपूर्व अरबांची परिस्थिती अत्यंत भयानक होती. त्यांच्या जातीय दंभ आणि अहंकाराची अवस्था अशी विलक्षण होती की ते जगातील कोणासही आपल्या समकक्ष समजण्यास तयार नव्हते. साऱ्या जगात फक्त आपणच श्रेष्ठ, वरचढ व बोलके आणि इतर मात्र आपल्यापेक्षा कनिष्ठ व खालच्या पातळीचे. प्राचीन काळापासूनच इतर देशांप्रमाणे येथेही गुलामगिरीची प्रथा प्रचलित होती आणि गुलामांचे बाजार भरत असून पशु-पक्ष्यांप्रमाणे माणसांची खरेदीविक्री होत असे. एकदा खरेदी केलेला गुलाम आजीवन दासत्वाच्या आणि हीनतेच्या अपमानास्पद जीवनाचे कठीण भोग भोगत असे. यानंतर त्याची संतती आपोआपच मालकाची व्यक्तिगत संपत्ती ठरत असे. मेलेल्या गुलामाच्या मुलीकडून मालक बिनधास्तपणे वेश्याव्यवसाय करवून घेत असे.

अशा अत्यंत दूषित आणि खडतर वातावरणात इस्लामचा संदेश आला. इस्लामने सर्वप्रथम मिथ्या व काल्पनिक देवी-देवतांचे साम्राज्य नष्ट करून लोकांना केवळ निराकार आणि एक असलेल्या ईश्वराच्या उपासनेचे बाळकडू पाजले. माणसामाणसांतील हर प्रकारच्या भेदभावाच्या भिंती जमीनदोस्त करून 'समस्त मानव एकसमान' असल्याची घोषणा केली. इस्लामने अगदी स्पष्ट शब्दांत बजावले की, ज्याप्रमाणे समस्त सृष्टीचा निर्माता आणि स्वामी एकच आहे, त्याचप्रमाणे त्याने निर्माण केलेले समस्त मानवसुद्धा एकच आणि समान आहेत. रंग, वर्ण, वंश, जात आणि देशाच्या व भाषांच्या आधारांवर कोणीही श्रेष्ठ वा कनिष्ठ ठरत नाही. केवळ सदाचारी माणूसच दुराचारी माणसाच्या तुलनेत श्रेष्ठ ठरू शकतो. चांगले कर्म करणारी व्यक्ती कोणत्याही वर्णाची अगर कोणत्याही वंशाची असो, कोणत्याही देशाची वा प्रांताची आणि कोणतीही भाषा बोलणारी असो, ती वाईट कर्म वा दुराचार करणाऱ्यापेक्षा निश्चितच श्रेष्ठ असणार. याबरोबरच वाईट कर्म करणारी व्यक्ती ही कोणत्याही प्रकारे उच्चकुलीन असो आणि कितीही गौरवर्णीय व कोणतीही भाषा बोलणारी असो, ती चांगले कर्म करणाऱ्या कोणत्याही व्यक्तीपेक्षा निश्चितच कनिष्ठ असणार. कुरआनात स्पष्टपणे म्हटले आहे,

"लोकहो! आम्ही (स्वयं ईश्वराने) तुम्हास केवळ एका मनुष्य आणि एका स्त्रीपासून उत्पन्न केले आणि तुमचे गोत्र आणि परिवार बनविले, जेणेकरून (नावाने) तुम्ही एकदुसऱ्यांना ओळखावे. निश्चितच तुमच्यापैकी श्रेष्ठ तोच आहे, जो सर्वांत अधिक सदाचारी आणि ईश्वराचे भय बाळगणारा आहे." (संदर्भ : कुरआन - ४९ : १३)

ही कुरआनरूपी ईश्वरी संविधानाची प्रस्तावना असून याद्वारे मानवी ऐक्याची स्पष्ट घोषणा करण्यात आली. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आपल्या जीवनाच्या अनेक महत्त्वपूर्ण प्रसंगी याच प्रस्तावनेची पुष्टी आपल्या ओजस्वी वाणीने केली आहे. मक्का-विजय हा इस्लामी इतिहासातील अतिशय महत्त्वपूर्ण घटना आहे. या प्रसंगी प्रेषित मुहम्मद (स.) यांनी स्वत: आपल्या कुरैश कबिल्याच्या लोकांना जे जातीय वर्चस्वाच्या अहंकाराने झिंगलेले होते, संबोधित करून आपल्या विजयी भाषणात म्हटले,

"हे कुरैश कबिल्याच्या लोकांनो! हे अरबवासियांनो! आज ईश्वराने इस्लामपूर्व काळातील अज्ञानपूर्ण दंभ व वांशिक अहंकार नष्ट केला आहे. समस्त मानवजात आदमचीच संतती असून आदमची (सर्वप्रथम मानव) निर्मिती मातीपासून करण्यात आली."

याप्रसंगाच्या दोन वर्षांनंतर प्रेषित मुहम्मद (स.) यांचा शेवटचा हज होत असल्याच्या ऐतिहासिक प्रसंगी त्यांनी आपल्या तब्बल सव्वा लाख अनुयायांना

संबोधित करताना एक विस्तृत भाषण दिले. या भाषणामध्ये अरबेतर देशांच्या नागरिकांवर अरब देशातील नागरिकांच्या वांशिक अहंकाराच्या आणि जातीय श्रेष्ठत्वाच्या समाप्तीची घोषणा करताना म्हटले,

"लोकांनो! तुम्हा सर्वांचा पालनकर्ता एकच (अर्थात ईश्वर) आणि पूर्वजही एकच (अर्थात आदम) करिता समस्त मानवजात आदमचीच संतती असून आदमची निर्मिती ईश्वराने मातीपासून केली आहे. करिता ईश्वराने इस्लामपूर्व काळातील अज्ञानपूर्ण गर्व आणि वांशिक अहंकार नष्ट केला. संयमी, धर्माचारी अगर दुराचारी वा दुर्दैवी सर्वचजन आदमची संतती असून आदमची निर्मिती मातीपासून करण्यात आली आहे."

याचप्रसंगी त्यांनी म्हटले,

"जर तुमच्यासाठी एखादा कान कापलेला अगर काळा दास जरी शासनाधिकारी नियुक्त करण्यात आला असेल, जो ईश्वरी धर्मग्रंथानुसार (कुरआनानुसार) तुमचे नेतृत्व करीत असेल. तर तुम्ही त्याची आज्ञा पाळली पाहिजे."

गुलामाबरोबर प्रेम, समता आणि सहानुभूतीचा व्यवहार करण्याची प्रेषित मुहम्मद (स.) मुस्लिमांना शिकवण देत असत आणि त्यांना दासत्वातून मुक्त करण्यास महान पुण्यकर्म ठरविले. याविषयी त्यांनी स्पष्टपणे म्हटले,

"ईश्वराने तुमच्या या (गुलाम) बांधवांना तुमच्या अधीनस्त केले. म्हणून तुम्ही स्वत: जे खाता, तेच त्यांनाही द्या आणि तुम्ही जसे वस्त्र परिधान करता, तेच त्यांनाही द्या. त्यांच्या क्षमता आणि शक्तीपेक्षा जास्त कामाचे ओझे त्यांच्यावर टाकू नका. त्यांच्यावर कामाचा ताण वाढला असेल तर त्यांची मदत करा. जर त्याने तुमच्यासाठी भोजन तयार करून आणले असेल तर त्याला स्वयंपाक करताना निश्चितच गरमीचे चटके बसले असतील, धूर सहन करावा लागला असेल. करिता त्यालाही सोबत घेऊन जेवण करा."

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी त्यांच्या जीवनाच्या अंतिम क्षणी गहिवरून म्हटले,

"नमाज नियमित अदा करावी आणि ईश्वराचे भय बाळगून गुलामांच्या अधिकारांचे रक्षण करावे."

ही काही केवळ मौखिक शिकवण नव्हे अथवा विधान-ग्रंथाची फक्त शोभा वाढविण्यासाठी मारलेल्या गप्पा नव्हेत. तर या मानवतापूर्ण शिकवणींना इस्लामी समाजाने कर्माचे व कृतींचे कसे स्वरुप दिले, त्यांची काही आदर्श दृष्ये आपण येथे पाहू या.

१) माननीय मारुर (रज़ी.) यांचे कथन आहे,

"एकदा मी प्रेषित मुहम्मद (स.) यांचे अनुयायी माननीय अबूजर गफ्फारी (रज़ी.) यांना भेटलो, तेव्हा मी पाहिले की ते आपल्या गुलामासोबत गप्पा मारीत बसले होते आणि दोघांचाही पोषाख सारखाच होता. अर्थात अबूजर (रज़ी.) यांनी जसा अंगरखा

घातलेला होता अगदी तसाच त्यांच्या गुलामाच्याही अंगावर होता. मी आश्चर्याने याचे कारण विचारले, तेव्हा अबूजर (रज़ी.) शांतपणे उत्तरले की, 'हे बघा मारूर (रज़ी.)! एकदा मी प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या उपस्थितीत आपल्या गुलामास दरडावून बोलत होतो, यावर प्रेषित मुहम्मद (स.) यांनी मला बजावले की, अरे अबूजर (रज़ी.)! इस्लामपूर्वीची मानसिकता अद्यापही तुमच्यातून नष्ट झालेली नाही. नीट लक्षात घ्या, तुमचे गुलाम तुमच्या पालकत्वात देण्यात आलेले आहेत. म्हणून ज्या व्यक्तीचा गुलामबंधु तिच्या अधीन असेल त्या व्यक्तीने जे स्वत: खाते तेच त्यास खाऊ घालावे आणि जी वस्त्रे स्वत: वापरते, तशीच वस्त्रे त्यालाही वापरायला द्यावी.'' (संदर्भ : बुखारी - हदीस ग्रंथ)

२) माननीय उमर (रज़ी.) हे प्रेषित मुहम्मद (स.) यांचे द्वितीय उत्तराधिकारी होते. त्यांच्या शासनकाळात एकदा इस्लामी सेना सीरिया देशात युद्ध मोहिमेवर होती. सीरियाची तात्कालीन राजधानी 'जेरुसलेम'वर इस्लामी लष्कराने विजय मिळविला तेव्हा तेथील जनतेने माननीय उमर (रज़ी.) यांना जेरुसलेमला स्नेहपूर्ण भेट देण्याचे आमंत्रण दिले. इस्लामी शासनाचे शासक माननीय उमर (रज़ी.) यांनी तेथील जनतेच्या विनंतीस मान देऊन मदीनाहून जेरुसलेमकडे रवाना झाले. या काफिल्यामध्ये लोक जास्त होते आणि उंट मात्र कमी होते. करिता दोन-दोन जनांनी आळीपाळीने उंटावर स्वार होऊन प्रवास करण्याचे ठरले. अर्थात एकाने उंटावर स्वार व्हावे तर दुसऱ्याने उंटाची लगाम धरून पायी चालावे. मग दुसऱ्याने उंटावर स्वार व्हावे तर पहिल्याने उंटाची लगाम धरून चालावे. माननीय उमर (रज़ी.) यांच्याबरोबर एक आफ्रिकन गुलाम होता. ठरल्याप्रमाणे प्रवास सुरु झाला. जेरुसलेम शहर जवळ येताच योगायोगाने माननीय उमर (रज़ी.) यांची उंटाचे लगाम धरून पायी चालण्याची आणि त्यांच्या गुलामाची उंटावर स्वार होण्याची पाळी आली. त्यांच्या गुलामाने खूप आग्रह केला की माननीय उमर हे इतक्या मोठ्या शासनाचे सर्वोच्च शासक असल्याने उंटावर स्वार होऊनच शहरात दाखल व्हावे आणि आपण गुलाम असल्याने उंटाची लगाम धरून आपण पायी चालावे. कारण एका भल्या मोठ्या राज्याच्या शासकास हे शोभणार नाही की, त्याचा गुलाम उंटावर स्वार असावा आणि त्याने मात्र उंटाची लगाम धरून पायी चालावे. मात्र मानवाधिकाराचे रक्षणकर्ते आणि सत्याचा झेंडा हाती असलेले माननीय उमर (रज़ी.) यांना गुलामाचे अधिकार, प्रतिष्ठा आणि व्यर्थ अभिमानापेक्षा कितीतरी जास्त पटीने प्रिय होते. त्यांनी गुलामास उंटावरच बसण्यास सांगितले आणि स्वत: मात्र उंटाची लगाम पकडून पायीच जेरूसलेम शहरात दाखल झाले.

शहराच्या प्रवेशद्वारावर माननीय उमर यांच्या स्वागतासाठी प्रचंड जनसागर लोटला होता. मात्र त्यांनी जेव्हा माननीय उमर (रज़ी.) यांना अशा या साध्या अवस्थेत पाहिले आणि हेदेखील पाहिले की, त्यांचा गुलाम उंटावर आणि ते स्वत: पायी चालत

आहेत, तेव्हा त्यांना आश्चर्याचा सुखद धक्का बसला. त्यांना माननीय उमर (रज़ी.) यांच्या आचरणपद्धतीतून समता, स्नेह, बंधुत्व, त्याग, सत्यनिष्ठा, न्याय, मानवाधिकार आणि मानवी मूल्यांचे साक्षात दर्शन घडले.

३) एकदा माननीय उमर (रज़ी.) यांनी एका भल्यामोठ्या थाळीत खाण्याचे मस्त चमचमित पदार्थ आणले. मग गोरगरीब आणि गुलामांना बोलावले, आपल्या जवळ बसवून मोठ्या प्रेमाने स्वतःच्या हाताने सर्वांना जेवण भरविले, आणि म्हटले,

"ज्यांना गुलामांसोबत जेवण करण्यात अपमान वाटतो, त्यांच्यावर अल्लाहचा धिक्कार असो!"

४) माननीय उमर यांच्या शासनकाळात राज्याच्या एका भागात जिबिल्ला नावाचा एक मांडलिक होता. त्याने नवीनच इस्लाम धर्म स्वीकारला होता. एकदा तो हज करण्यासाठी मक्का शहरी आला. हज करतेवेळेस त्याच्या अंगरख्यावर एका गरीब माणसाचा पाय पडल्याने तो क्रोधित झाला आणि रागाच्या भरात त्यास एक जोरदार झापड मारली. त्यानेही जिबिल्लास प्रत्युत्तरादाखल झापड मारली. कारण इस्लामने गरीबांतसुद्धा प्रत्युत्तराची प्रेरणा निर्माण केलेली आहे. जिबिल्ला परत संतापला एका सामान्य गरीबाने त्याच्या झापडीस प्रत्युत्तर देणे त्यास सहन न झाल्याने त्याने माननीय उमर (रज़ी.) यांच्याकडे तक्रार केली. माननीय उमर (रज़ी.) यांनी दोन्ही पक्षांचे म्हणणे ऐकून निर्णय दिला की,

"जिबिल्लाने एका गरीब माणसास झापड मारली असल्याने त्या गरीबाससुद्धा प्रत्युत्तरात जिबिल्लाच्या तोंडावर झापड मारण्याचा पूर्ण अधिकार प्राप्त आहे."

जिबिल्लास आशा होती की इस्लामी न्यायालयात एका सामान्य ग्रामीण गरीबाच्या तुलनेत माझ्यासारख्या एका मांडलिकाच्या सन्मान आणि प्रतिष्ठेचा विचार होईल आणि यानुसार निर्णय देण्यात येईल. मात्र त्याचा भ्रमनिरास झाला.

यालाच खरा न्याय म्हणतात आणि हीच खरी समानता व आदर्श मानवता होय. यानेच मानवतेचा राजमार्ग प्रशस्त होतो, मानवतेचे वातावरण निर्माण होते आणि मानवजीवन स्वर्गमय होते.

## अंतिम निवेदन

'मानवतेचा राजमार्ग' हे पुस्तक मानवतेच्या स्थापनेच्या उद्देशाने लिहिण्यात आले आहे. शिवाय हे पुस्तक हिंदु, मुस्लिम, शिख, ईसाई, जैन, बौद्ध व इतर अशा सर्वच धर्मबांधवासाठी आहे, ज्यांच्या अंतःकरणात मानवतेची अपार सहानूभुती आणि कळवळा आहे आणि ज्यांना अगदी मनापासून वाटते की, आपल्या देशात मानवतेचे स्वर्ग फुलावे.

हे एक अत्यंत कटू सत्य आहे की, काहीना कळतनकळत दिशाभूल झालेली असून ते इतरांचीही दिशाभूल करताहेत. अर्थातच या महाभागांना वाटते की, देशाचे कल्याण करायचे असेल तर येथे एकच भाषा, एकच सभ्यता, एकच संस्कृती, एकच प्रथा आणि एकच कायदा अर्थात समान नागरी कायदा असावा. अशा या विचित्र आणि विलक्षण गैरसमजूत झालेल्यांना मात्र एवढेही कळेनासे झालेले आहे की ज्या ज्या देशात भाषा, सभ्यता आणि नागरी कायदा सर्वांसाठी समान आहे, एवढेच नव्हे तर धर्म आणि परंपरादेखील समान आहे त्या देशांची काय अवस्था आहे, तेथे किती उपद्रवाचे तांडव माजलेले आहे आणि देशाच्या कल्याणाची कशाप्रकारे ऐशीतैशी झालेली आहे.

करिता हे नीट लक्षात घ्यावे की, खरी मानवता जर जोपासायची असेल आणि खऱ्या अर्थाने देशाचे कल्याण करायचे असेल तर या देशाच्या बहुआयामी नंदनवनात प्रत्येक भाषेच्या, प्रत्येक सभ्यतेच्या प्रत्येक धर्म आणि प्रत्येक संस्कृतीच्या विविध फुलांचा सुगंध फुलू द्यावा, दरवळू द्यावा. मातेच्या सर्वच मुलांना सारखे प्रेम करु द्यावे, कारण ती सर्वच भावंडांची शेवटी माताच असते, कोणत्याही मुलास तिच्या ममत्वापासून वंचित करता कामा नये. सर्वच भावंडांनी या विविधतेने नटलेल्या नंदनवनात गुण्यागोविंदाने बागडावे, सर्वच भावंडांनी एकदुसऱ्यांच्या सुख-दुःखात सहभागी असावे, खांद्यास खांदा लावून देशात मानवता आणि बंधुत्वाची स्थापना करावी, सदाचार, सत्य, अहिंसा आणि मानवी मूल्यांची स्थापना करण्यात सर्वांनीच एकदुसऱ्यांवर बाजी मारावी, एक दुसऱ्यांचा हेवा, द्वेश, ईर्ष्या करू नये.

या पुस्तकात हिंदूधर्म आणि इस्लामच्या ज्या शिकवणी सादर करण्यात आल्या आहेत, त्या देशासाठी पंचवार्षिक योजनापेक्षाही जास्त महत्त्वपूर्ण आहेत. जोपर्यंत देशामध्ये सत्य, ईमानदारी आणि शुद्ध आचरण व व्यवहार तसेच सांप्रदायिक सद्भाव प्रचलित होत नाही, याबरोबरच असत्य, बेईमानी, छळ-कपट, तिरस्कार आणि स्वार्थ, नफेखोरी, साठेबाजी, लाचलुचपत घपले, घोटाळे, पक्षपात, सांप्रदायिकता, जातीवाद नष्ट होत नाही, अर्थात दुसऱ्या शब्दांत मानवतेची स्थापना होत नाही, तोपर्यंत कोणतीही योजना यशस्वी ठरत नाही. आणि म्हणूनच या देशातील प्रत्येक देशप्रेमी नागरिकाचे हे परमकर्तव्य आहे की, सर्वांनी एकजूट होऊन सर्वप्रथम मानवतेचा उद्धार करावा. बंधुत्व, सद्भाव, सहिष्णुता, परोपकार, सत्य, न्याय, ईशप्रेम आणि ईशभय (जे मानवतेचे अनिवार्य गुण आहेत) आत्मसात करावे आणि घृणा, द्वेश, अहंकार आणि हिंसेचा त्याग करावा. हेच या पुस्तकाचे अंतिम लक्ष्य आहे. आणि हाच भारतीय समाजासाठी राजमार्ग आहे. याच राजमार्गावर चालून आपल्याला इहलोकी आणि परलोकी जीवनात पूर्ण सफलता मिळेल.

**समाप्त**